Mahavatha K. R. RAGHUNATHA RAO.

For Ladies and Gentlemen.

# SAUBHAGYA MANDIR.

14794

## PART I.

( INTENDED TO IMPROVE THE STATUS OF OUR WOMEN AND TO INSTRUCT THEM THEIR DUTIES. )

*COMPILED FROM THE PURANAS AND VARIOUS OTHER SOURCES.*

BY THE AUTHOR

OF

SEVERAL BOOKS ON FEMALE EDUCATION,

'THMETIC AND

OF

१

सुशीलस्त्रिया आणि पुरुष यांच्याकरितां.

# सौभाग्यमंदिर.

## (भाग पहिला.)

स्त्रियांची योग्यता वाढावी, त्यांचें खरें कर्तव्य-कर्म त्यांस समजून यावें, व आमच्या समाजास त्यांनीं भूषणभूत व्हावें याकरितां.

स्त्रियांनीं संसारांत कसें वागावें, वाईट गोष्टी कोणत्या व चांगल्या कोणत्या यांची माहिती, स्त्रियांस शिक्षण कशा प्रकारचें पाहिजे याजबद्दलचा विचार आणि पुराणप्रसिद्ध स्त्रियांचा माहिती, व सुशील स्त्रियांस योग्य ते विचार यांत सविस्तर रीतीनें वर्णन केले आहेत.



पुराणें व हल्लींच्या रीति आणि गोष्टी यांच्या आधारें.

ग्रंथकार

स्त्रीशिक्षणविषयक, इतिहास, भूगोल, सत्यभामा आणि विष्णुपंत. इ. इ. इ. ग्रंथांचे कर्ते यांनीं तयार केला.

२४ श्री यथामत

इ० सन १८८९

मुंबई एथें
" इंडियन प्रिंटिंग " छापखान्यांत छापविलें.

# प्रस्तावना.

———:०:———

स्त्रीशिक्षण, स्त्रीदास्यविमोचन, स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रीपुनरुद्वाह-प्रकरण वगैरे केवळ स्त्रीजनसंबंधी विषयांवर आजकाल अनुकूल आणि प्रतिकूल शब्दवर्षाव इतके कांहीं होऊन गेले आहेत कीं, त्यांच्या त्या पर्वतप्राय ढिगांत, आपणाहि आणखी एक खेप टाकल्यानें अल्पस्वल्प तरी भर पडावी, असें कोणाहि विचारी मनुष्याच्या मनांत यापुढें येईल असें आह्मांस वाटत नाहीं. त्यापासून व्यर्थ मेहनत; यापलीकडे प्रत्यक्षतः असा कांहींच फायदा होण्याची आशा नाहीं. वस्तुतः जे विषय अत्यंत महत्त्वाचे, उपयोगाचे व इष्ट आहेत त्यांजविषयींच्या चर्चेत, कोणाच्या ग्रहणधारणाशक्तीमध्यें जसा तारतम्य भाव असेल त्या मानानें अनुकूल किंवा प्रतिकूल अभिप्राय येवो; तेऱ्हढयानें चर्चाविषयक गोष्टींत कांहीं देखील बिघडाबिघड होण्याची भीति नसते, किंवा त्याजविषयीं प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें वीटहि येत नसतो. पण तोच अनुकूल किंवा प्रतिकूल अभिप्राय जरका केवळ अंधळ्या अभिमानानें पुढें येऊं लागला, तर मात्र त्यापासून सदहु इष्ट कार्य पुष्कळप्रकारें नासून जाण्याचा संभव असतो. असाच प्रकार या स्त्रीजनसंबंधी विषयांच्या इतके दिवसांच्या चर्चेत झाला आहे.

प्रतिकूल असलेल्या पक्षांत अज्ञानी, जुन्या समजुतीच्या, कोत्या विचाराच्या, 'दुराग्रहपिशाचिकेनें' झपाटलेल्या, वगैरे लोकांची गणना केली जाते; ती घटकाभर कबूल करून त्या पक्षाकडे कदाचित् दुर्लक्ष्य करूं; पण अनुकूल ह्मणविणाऱ्या पक्षाकडून येणाऱ्या शब्दवृष्टींत तरी ते कोठें सांपडत नाहींत; इकडेसुद्धां अज्ञान, जुन्या तऱ्हेची समजूत आणि 'दुराग्रहपिशाचिकेचाच' संचार पूर्ण आहे. (इकडील अज्ञान, ह्मटलें ह्मणजे आमचें आहे काय व व्हावें काय ? याविषयीं—इकडील जुन्या तऱ्हेची समजूत ह्मटली ह्मणजे आमच्या पूर्वजांनीं अनुभवसिद्ध करून ठेवलेली नव्हे, तर ज्यांना गुरुस्थानीं बसवून २४ची यथामत चालरीत उचलण्याची पोरकट हौस आह्मांत

आलीकडे शिरली आहे त्यांची अनुभवत्यक्त*जुनी समजूत होय; आणि 'दुराग्रहपिशाचिके' चा संचार झटला ह्मणजे असा कीं, जुन्याशीं तडजोडीचा विचार काढून समेटानें कोणतीही सुधारणा करावयाचीच नाहीं. तेव्हां अशा उभय पक्षांच्या गर्दीत हे विषय इष्ट असूनहि यावे तसे रंगारूपास येत नाहींत, यांत कांहीं फारसें नवल नाहीं. याकरितां आतां असल्याच गर्दीत न मिसळतां होईल त्या प्रकारें ती कमी कमी करून शेवटीं साफ- ल्यास अगदीं मोडून टाकण्याचा प्रयत्न करणें हेंच समंजस- पणाचें कृत्य होणार आहे; असें आह्मांस वाटल्यावरून ही निराळ्या प्रकारची कृति आज वाचकजनांपुढें ठेवण्याचें आह्मीं मनांत आणलें आहे.

आपेच्या शक्तीप्रमाणें वरील ढिगांतल्या जेवढ्या माल- मसाल्याचा उपयोग करतां आला तेवढा करून हें '**सौभाग्यमंदिर**' उभें केलें आहे. हें कौतुकानें पहावयास आणलेल्या इष्टमित्रांच्या सूचना, यांत क्षणभर तरी विश्रांति घेऊन आमच्या श्रमाचें सार्थक करणाऱ्या स्त्रीपुरुष- वाचकजनांच्या सुखसोयी, आणि विचारी व विद्वान ग्रंथकारांची मदत, इतक्या गोष्टी जसजशा आह्मांस लक्ष्यांत घेण्यास फावत जाईल तसतसें हें **मंदिर** ह्याहूनहि विस्तृत करण्याची आमची इच्छा आहे.

**ग्रंथकार.**

* स्त्रियांच्याच संबंधानें तर काय, पण इतरहि कित्येक बाब- तींत आह्मी विलायती नमुन्यावर इकडे सुधारणा उठविण्याचा प्रयत्न आरंभतों आहोंत; तीं तिकडे मूळस्थानीं तीं सुधारणा अनिष्ट ठर- लीं जाऊन त्याज्य होत चालल्याचें आमच्या ऐकण्यांत येत असतें. स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य, प्रौढविवाह वगैरे संबंधानें विला- यतेकडील आलीकडे प्रसिद्ध होणारे कित्येक लेख पहावे. ह्या सहज कळेल.

# अनुक्रमणिका.

# सौभाग्यमंदिर.



## स्त्रियांची योग्यता.

### ( प्रकरण पहिलें. )

**अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमःसखा ॥**
**भार्यामूलं त्रिवर्गस्य भार्यामूलं तरिष्यतः ॥ १ ॥**

—महाभारत.—

" **भार्या** ही मनुष्याचें अर्धांग आहे; भार्या ही उत्तम मित्र आहे; धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांची मूळ ( ह्मणजे हे तीन पुरुषार्थ प्राप्त करून देणारी ) भार्याच आहे; आणि भार्येच्या योगानेंच मनुष्य हा संसार-समुद्र सहजगत्या तरून जातो. " स्त्रियांची खरी योग्यता दर्शविणारा महाभारतांतील हा श्लोकार्थ ऐकून, " **अगबाई, इतकी का आपली योग्यता मोठी आहे !** " अशा आश्चर्यानें आमचा बहुतेक स्त्रीवर्ग तोंडावाटें उद्गार काढील, व आपल्या हनुवटीवर करांगुली ठेऊन आपल्यास नवल वाटल्याचें चिन्ह दर्शवील. पण इतकें नवल कांहीं वाटावयास नको. आम्ही आमच्या भगिनीवर्गास अगदीं खात्रीपूर्वक सांगतों कीं, त्यांची खरोखरच एवढी मोठी योग्यता आहे. केवळ भोग्यवस्तु किंवा प्रजोत्पत्तीचें एक साधन याहून त्यांची गणना विशेष आहे. **महाभारतांतील** शांतिपर्वांत शरपंजरीं पडलेले **भीष्म** हे **धर्मादि** पांच पांडवाना राजधर्म सांगत असतां एके ठिकाणीं **कपोत**

पक्ष्याची कथा सांगतांना त्या पक्ष्याचे मुखानें स्त्रियांची प्रशंसा वदवितात ती अशी. “ रुग्णावस्थेस ज्या प्रमाणें औषध, त्याचप्रमाणें विपत्कालास भार्या ही होय. संसारचिंतामग्न चित्तास मित्राप्रमाणें धैर्य देणारी भार्याच होय. आणि मनुष्यास प्रपंचव्यवहारांत बंधूप्रमाणें आश्रय व सहाय्य मिळणारें दुसरें स्थान ह्मटलें ह्मणजे भार्या हेंच होय. ” स्त्रियांची वास्तविक योग्यता दर्शविणारीं अशीं प्रमाणें ग्रंथान्तरीं पुष्कळ आढळण्यासारखीं आहेत.

परंतु केवळ ग्रंथाधारें आपली योग्यता समजणें ही एक गोष्ट आणि वस्तुतः तशी ती योग्यता आपल्या ठिकाणीं असणें ही दुसरी गोष्ट होय, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. कारण नुसते ग्रंथांत आपल्या प्रशंसेचे शेंकडो उतारे सांपडले ह्मणजे लागलेच आपण प्रशंसनीय बनतों असें नाहीं. प्रशंसनीय बनण्यास आंगीं योग्यता आणणारीं साधनें वेगळींच आहेत; ह्या ग्रांथिक वचनांचा उपयोग इतकाच कीं, अतिशय अज्ञानावस्थेंत आपला बराच काल गेल्यामुळें आपणास आपल्या खऱ्या योग्यतेचें जें विस्मरण होत असतें, व आपण भोगीत असलेल्या विद्यमान हलक्या स्थितींतच कांहीं एक प्रकारचें समाधान मानून घेण्याची आपणास जी एक संवयच लागते, तें विस्मरण व ती संवय जाण्यास असलीं ग्रंथवचनें पुष्कळच कारणीभूत होत असतात. ग्रंथवचनांची मातब्बरी याहून कांहीं जास्त नाहीं.

एका सिंहाच्या बच्चाची अशी एक गोष्ट सांगत असतात कीं, उपजल्यापासून पुढें बहुत कालपर्यंत तो में-

रांच्या कळपांत वाढला असल्यामुळें आपला जातिस्वभाव विसरून जाऊन त्या निरुपद्रवी प्राण्यांप्रमाणेंच तो आपली कालक्रमणा करीत असे. परंतु एकेसमयीं कोणी त्या छोंव्यास त्याच्या मूळस्वरूपाची ओळख करून देतांच तो आपल्या नैसर्गिक उग्र वृत्तीवर तत्काल येऊन लागलीच आपलें वनराज्य उपभोगण्यास चालता झाला.

या गोष्टीवरून तात्पर्य इतकेंच घ्यावयाचें कीं, एखाद्या कांहीं आगंतुक कारणानें आपण आपली वास्तविक योग्यता विसरून जाण्याचा संभव असतो; व तशा प्रसंगीं कांहीं अन्य साधनांनीं तें स्मरण आपणास झालें ह्मणजे मात्र आपण त्या आपल्या योग्यतेस चढण्याचा व आपलें नष्ट महत्व पुनः मिळविण्याचा प्रयत्न करूं लागतों. याच न्यायाला अनुसरून या पहिल्या निबंधांत कांहीं थोडेसे ग्रंथाधार घेऊन आह्मी आमच्या स्त्रीजनांस त्यांच्या वास्तविक योग्यतेचें ज्ञान करून देण्याचा विचार केला आहे. स्त्रिया ह्मणजे केवळ भोगांगना अथवा दासीबटकी असें मानणाऱ्या कित्येक अनुदार मंडळींनाही हे विचार मननसहाय होवोत व अशी योग्यता स्त्रीयांनाही समजली ह्मणजे वरील सिंहशावकाप्रमाणें त्या आपल्या महतीप्रत पावून आपलें गृहराज्य सुखेनैव उपभोगोत हीच आमची अत्युत्कट इच्छा आहे.

अनेक ग्रंथांतील आधार घेऊन त्यांच्या योगानें स्त्रियांची योग्यता सिद्ध करतांना आणखी एका गोष्टीचा विचार करावा लागतो. ती गोष्ट अशी. ग्रंथांत स्त्रियांची योग्यता दर्शविणारे जसे अनेक लेख आहेत तसेच त्यांची

अत्यंत अयोग्यता दर्शविणारेही कांहीं आहेत. आणि आज बरेच दिवसांपासून हे अयोग्यता दर्शविणारे लेखच —कोणाच्या कांहीं मतलबानें ह्मणा किंवा गैरसमजुतीनें ह्मणा—वरचेवर पुढें येत गेल्यामुळें त्यांचा सर्वांचे मनावर विशेष परिणाम घडला आहे, इतकेंच नव्हे, तर स्त्रियांशीं वागणूक ठेवतांना एकंदर पुरुषवर्ग त्या अत्यंत अयोग्यता दर्शविणाऱ्या लेखांच्याच धोरणानें राहात आहे; आणि स्त्रियांसुद्धां आपल्याला तसेंच समजून असल्या स्थितींतच समाधान वृत्तीनें काळ कंठीत आहेत. या भागाचे प्रारंभीं दिलेलें वचन पाहून " **स्त्रियांना नवल वाटेल** " ह्मणून जें आह्मी ह्मटलें आहे त्याचा हेतु तरी हाच आहे. तेव्हां त्या आयोग्यता दर्शविणाऱ्या लेखांचा प्रथमतः या ठिकाणीं निकाल लावल्यावांचून आमचें पुढचें लिहिणें मतलबी किंवा एकदेशीय असेंच ठरण्याचा संभव आहे; अथवा शंका कशाला ? खचित तसेंच तें ठरेल. याकरितां अगोदर त्यांजबद्दल विचार करूं.

असल्या लेखांच्या संबंधानें आमची दोन प्रकारची समजूत आहे. एक प्रकार असा आहे कीं, त्या लेखांतील कांहीं लेख प्रसंगानुरोधानें लिहिले गेले असावेत असें आह्मी समजतों; व दुसरा असा कीं, कांहीं एका विशेष अर्थाचे सिद्धतेकरितांही त्यांतील बरेच लेख पुढें आले आहेत असें आह्मी मानतों. **स्त्रियांची अयोग्यता** दाखविणारे जेवढे ह्मणून लेख ग्रंथांत आढळतील त्यांचा, आह्माला वाटतें, वरील दोन प्रकारांतच अंतर्भाव करतां येईल.

आतां प्रसंगानुरोधानें ह्मणजे कसें तें आपण पाहूं.

श्रीरामचंद्रास राज्यावर बसविण्याचा आनंदकारक समारंभ करण्यांत सर्व अयोध्यावासी नागरिकजन तल्लीन झाले असतां केवळ मत्सरबुद्धीनें कैकयी त्यांत विघ्न आणते व एवढा प्रतापशाली पृथ्वीपति राजा दशरथ स्त्रीलोभांत गुंतून तिजपुढें पदर पसरतो, तरीही ती आपला आग्रह सोडीत नाहीं; अशा प्रसंगीं श्रीधर कवीनें आपली वाक्सरणी स्त्रियांच्या संबंधानें जराशी कडक* केली तर ती केवळ प्रासंगिक नाहीं असें कोण ह्मणेल बरें? तसेंच एवढा राघोबादादा शूर पुरुष; ज्यानें पेशव्यांचा जरीपटका अटकेपर्यंत मिरवून आणला; तो आनंदीबाईचा बुद्धिवाद ऐकून आपणच पुढें पेशव्यांच्या राज्यवैभवास अग्नि लावण्यास कारण होतो! तशा एखाद्या प्रसंगीं, "स्त्रीबुद्धिः प्रलयंगतः"—स्त्रियांच्या बुद्धीनें चालल्यामुळें महान् अनर्थ घडतो—अशा अर्थाचें एखादें वचन कोणाच्या मुखांतून निघणें किती स्वाभाविक आहे बरें! अशा प्रसंगीं तें कोणी कांहीं दुष्ट मतलबानें पुढें आणलें आहे असें बिलकुल ह्मणतां येत नाहीं. याचप्रमाणें स्त्रियांना कपटी, साहसी, अतिकामी, मत्सरी वगैरे जीं अनेक दुर्विशेषणें योजलेलीं आढळतात, तीं अशींच केवळ प्रसंगविशेषाचींच दर्शकें होत असें मानलें पाहिजे. कारण तसें नसतें,

* "स्त्रीलोभाचिये आवर्डी ॥ प्राणी नाडिले लक्षकोडी ॥ जन्ममरणाचिया ओढी ॥ माजी पडिले बहुतची ॥ १ ॥ स्त्रीलोभ परमदारुण ॥ पूर्वी नाडिलें बहुतजण ॥ मूर्तिमंत भवव्याधी कामीन भुलवी सज्ञान जाणते ॥ २ ॥ संसार अनर्थास मूळ ॥ तो स्त्रीसंबंध जाण केवळ ॥ स्त्रीलोभें पापें सकळ ॥ अंगीं येऊनी झगडती ॥ ३ ॥" —रामविजय—

व त्यांचा उपजत स्वभावच ह्या दुर्विशेषणांस नेहमीं पात्र असता, तर तद्विरुद्ध जीं त्यांचीं चांगलीं गुणविशेषणें* ग्रंथांतरीं पुष्कळ आढळतात तीं दृष्टीस पडतीं ना. परंतु ज्या अर्थीं तशीं चांगलींही वर्णनें ग्रंथांत पुष्कळ सांपडतात, त्या अर्थीं स्त्रियांचा उपजत स्वभाव कांहीं या दुर्विशेषणांस पात्र नाहीं. आणि क्वचित् व्यक्तिविशेषीं जर तो पात्र असल्यासारखा दिसलाच तर तो कांहीं तरी आगंतुक कारणानेंच तेथें बनला आहे असें समजलें पाहिजे. ह्या आगंतुक कारणांत बहुकाल अज्ञानस्थिति व साहजिक परावलंबन ह्यांचा आह्मीं अंतर्भाव करतों.

आतां विशेष अर्थाचे सिद्धतेकरितां स्त्रियांवर कांहीं दोषारोप झाले आहेत ह्मणून जें आह्मी ह्मणतों तें कसें तें पाहूं. जगांत अत्यंत मोहक असे कनक आणि कांता

---

* स्त्रीषुप्रीतिर्विशेषेण स्त्रीष्वपत्यंप्रतिष्ठितं ॥
धर्मार्थौ स्त्रीषुलक्ष्मीश्च स्त्रीषुलोकाः प्रतिष्ठिताः ॥ १ ॥
मूलंहिरस्यपत्यानां स्मृतं नार्योपरंनृणां ॥
तासां दुःखोपशमनं कर्तव्यं सर्वदा नरैः ॥ २ ॥

**भावार्थ**—" विशेषेंकरून पुरुष स्त्रियांवरच प्रीति फार ठेवतात; कारण कीं श्रेष्ठ सुखाचें साधन, प्रजोत्पादनाचा मार्ग व धर्मादि कृत्यांत साह्यकारी त्यांना स्त्रियाच आहेत. नानाप्रकारचे सात सायास भोगून पुरुष द्रव्यार्जन जें करतात तें केवळ स्त्रीसमागमें संसारसुख भोगावें एतदर्थच होय. संसारांत मुख्य सुख कायतें स्त्रियांचेंच आहे. ह्मणून ( चरकाचार्य ह्मणतात कीं, ) पुरुषांनीं सर्वकाळ स्त्रियांच्या दुःखाचें निवारण करीत असावें हेंच योग्य आहे."

हे दोन *पदार्थ निवडून काढले आहेत. केवळ परमार्थ प्राप्तीकरितां ज्यांना ऐहिक सर्व विषयांवरील आपली आसक्ति नाहींशी करावयाची असेल, त्यांना त्या दृष्टीनें या दोन पदार्थांस अत्यंत तुच्छ मानून त्यांचा येईल तितक वीट आपल्या ठायीं आणून ठेवावा लागतो. अर्थात अशा दृष्टीनें विचार करणारापुढें आमच्या स्त्रियांची योग्यता कोणत्या प्रकारची राहणार आहे हें दिसतेंच आहे. एक संस्कृत सुभाषित आहे त्यांत स्त्रियांकडे कोण कोण कोणत्या दृष्टीनें पहात असतात त्याचें वर्णन मोठ्या मौजेनें केलें आहे. तें सुभाषित असें.

एक एव पदार्थस्तु त्रिधा भवति वीक्षितः ॥
कुणपं कामिनी मांसं योगिभिः कामिभिः श्वभिः॥१॥

अर्थ–स्त्री हा एकच पदार्थ आहे; पण तिघेजण त्याकडे तीन दृष्टीनें पहातात. तें असें. दुर्गंध्यादि साहत्वास्तव योगी त्याकडे शव दृष्टीनें पाहतात; विषयी जन जे आहेत ते कामुकतेनें त्यांकडे सौंदर्य दृष्टीनें पाहतात; आणि श्वानांना भक्ष्य दृष्टीनें त्या मांसपिंडाप्रमाणें दिसतात."

अस्तु; यावरून "विशेष अर्थाचे सिद्धतेकरितां" असें ह्मणण्याचा आमचा उद्देश काय हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. नसल्यास स्पष्टपणें थोडक्यांत सांगतों कीं, विशेषेंकरून परमार्थ दृष्टीनेंच विचार करणारे जे आमचे

---

* स्त्रिया धन या हे खोटे ॥ नागवले मोठे मोठे ॥ १ ॥
ह्मणोनी सांडा दोन्ही ॥ सुख पावाल निदानीं ॥ २ ॥
सर्व दुःखांसी कारण ॥ हींच दोन्हींच प्रमाण ॥ ३ ॥
–तुकाराम–

बहुतेक प्राचीन कविजन, त्यांनीं लोकांच्या मनांत परमार्थ प्राप्तीची अत्युत्कट इच्छा जागृत करून ठेवण्याकरितां ऐहिक विषयभोगांना तुच्छ करण्याचे भरांत जगांतील मोहक वस्तूंची जी निर्भर्त्सना केली आहे, त्यांतच आमच्या स्त्रिया सांपडून त्याही सहजच निर्भर्त्सिल्या गेल्या! विभांडक ऋषीचा मुलगा, ऋष्यशृंग यास जन्मापासून बराच कालपावेतों स्त्रीदर्शन नव्हतें; परंतु एकदां अप्सरांची व त्याची गांठ पडून त्यांच्या संगतीनें तो घोटाळ्यांत येतांच त्याच्या तपस्वाध्यायावर लागलीच पाणी पडून रात्रंदिवस तो स्त्रीचिंतनांतच मग्न झाला. या प्रसंगाचें वर्णन करतांना श्रीधरकवीनें, स्त्रियांच्या स्वभाविक मोहकतेनें जें भ्रांतचित्त होतें, तें होऊं नये याकरितां त्यांविषयीं सावध राहण्याकरितां त्यांची बरीच* निर्भर्त्सना केली आहे. पण तीही प्रसंगसंगती व हेतु हीं लक्षांत आणलीं असतां निरर्थक आहे असें कांहीं ह्मणतां येत नाहीं. सारांश अशा दोन कारणांनीं स्त्रीनिंदापूर्वक लेख लिहिणारे आमच्या

---

* "विसरला लेखन पठण ॥ ज्ञान, ध्यान आणि मनन ॥ लागलें मनीं स्त्रियांचें ध्यान ॥ अनर्थ पूर्ण स्त्री संगें ॥ १ ॥ गौडी, माध्वी, पयोष्णी ॥ तीन ऐशा प्रगट जनीं ॥ चौथें मद्य तें कामिनी दुर्गंधि नहाणी पापाची ॥ २ ॥ काय विद्या काय तप ॥ कायसें ध्यान काय जप ॥ कासया ज्ञान खटाटोप ॥ हरिलें सर्व स्त्रियांनीं ॥ ३ ॥ जिव्हा दग्ध परान्नें पाहीं ॥ हस्त दग्ध प्रतिग्रहीं ॥ मन दग्ध स्त्रीचे ठायीं ॥ करूनी काई जपतप ॥ ४ ॥ कवणें निर्मिली हे कुऱ्हाडी ॥ सबळ पुण्यवृक्ष तोडी ॥ कीं अविश्वासाची चौ बेडी ॥ जीवाच्या पायीं टाकली ॥ ५ ॥ काय अध्ययन काय कीर्तन ॥ व्यर्थ गेलें पुराणश्रवण ॥ काय करूं धर्मदान ॥ स्त्रियांनीं मन हारियेलें ॥ ६ ॥"–रामविजय.– (पुढचे पानावर टीप पहा.)

मतें मतलबादि दोषांस पात्र होत नाहींत. व त्यांच्याप्रमाणेंच त्यांच्या तशा विशेष हेतुक लेखांवरून आमच्या मतें स्त्रियांवरही अयोग्यतेचा किंचित सुद्धां मल राहत नाहीं. त्यांची महति सर्वसंमत आहेच आहे व योग्य साधनांनीं त्यांनीं ती आपली सदैव कायम ठेवावी हीच आमची इच्छा आहे.

ह्यां शिवाय स्त्रियांची अयोग्यता मनांत भरविण्यासारखें एखादे ठिकाणीं कवींचेंही लाघव आढळतें. पण तसल्या लाघवास कांहीं फारसें महत्त्व देतां येत नाहीं. कारण कवी हे वेळेस ज्यां रंगांत असतात त्या रंगांत मग त्यांना न्याय अन्याय, खरें खोटें वगैरे कशाचेंही भान मुळींच न राहून ते आपल्या विषयास वर्णन करण्याचा प्रसंग असेल त्याप्रमाणें वाटेल तेंव्हां उंच नीच पदाच्या अगदीं शिखरास नेऊन ठेवीत असतात. प्रत्यंतराकरितां पुढें एकच मासला घेऊं ह्मणजे पुरें आहे. मत्स्यपुराणांत एके ठिकाणीं पुढें दिलेला श्लोक आढळतो.

शास्त्रेषूक्त मसंदिग्धं बहुवारं महाफलं ॥
दशपुत्र समाकन्या यानस्याच्छीलवर्जिता ॥

---

स्त्रियांच्या संबंधानें तुकाराम बोवानींहि एके प्रसंगीं असेच तुच्छपणाचे उद्गार काढले आहेत.–

अभंग–" स्त्रियांचा तो संग नको नारायणा ॥ काष्टा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥ १ ॥ नाठवे हा देव न घडे भजन ॥ लांचावलें मन, आंवरेना ॥ २ ॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें॥ लावण्य तें खरें, दुःखमूळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी अग्नि झाला साधु ॥ परी पावे बाधु, संघट्टणीं ॥ ४ ॥

म्हणजे " अनेक शास्त्रांत निश्चयानें बहुवार महा फलदायक अशी एक गोष्ट सांगितली आहे ती ही कीं, जी उत्तम शीलसंपन्न कन्या आहे ती योग्यतेनें दहा पुत्रांसमान आहे."—या श्लोकांत कन्येला किती मोठेपणा दिला आहे. कन्याकुळ ज्यांना नाक मुरडण्यास व वाईट वाटण्यास कारण होतें त्यांना हा वरील श्लोक किती समाधानकारक आहे बरें? आतां तेच आमचे एक संस्कृत कविराज त्या कन्येची किती विटंबना करतात तें पहा—

संभवे स्वजनदुःखकारिका ॥
संप्रदानसमयेऽर्थहारिका ॥
यौवनेऽपि बहुदोषकारिका ॥
दारिका हृदयदारिका पितुः ॥ १ ॥

अर्थ—"जन्मल्या बरोबर जी आईबापांना वाईट वाटण्यास कारण होते, विवाहसमयीं जिच्यासाठीं व्यर्थ द्रव्य खर्च फार होतो, पुढें वयांत आल्यावर जिच्या सद्वर्तनाबद्दल संशय उत्पन्न होण्याचा संभव असतो, अशी ही कन्या म्हटली म्हणजे आईबापांच्या जीवाला केवळ कातर आहे असें समजावें."— कां, निंदेची कमाल झाली कीं नाहीं? कवीच ते; त्यांचा हात कोणी धरावा! आणि त्यांच्या असल्या निंदास्तुतिपर लेखांविषयीं मनांत विषमसमभाव तरी काय आणावा! कदाचित् दुसऱ्या एखाद्या वर्णन प्रसंगीं ते कन्येला अगदीं स्तुतिशिखरावर बसवून तेथेंच तिला अढळपदही देऊन टाकतील!

याप्रमाणें ग्रंथांतील साधक बाधक लेखांचा विचार

झाल्यावर आतां शेवटीं स्त्रियांची वास्तविक योग्यता दर्शवि-णारे कांहीं थोडे उत्कृष्ट उतारे देऊन हा निबंध पूर्ण करूं.

---

न तथैतेर्हि रोचंते गृहेषु गृहसंपदः ॥
यदिनस्याद्गृहे माता पत्नीवा पतिदेवता ॥
व्यंगे रथ इव प्राज्ञः कोनामासीत दीनवत् ॥ १ ॥

अर्थ—"घरामध्यें जननी किंवा पतिलाच दैवत मानणारी अशी पतिव्रता स्त्री नसेल तर पुष्कळ गृहसंपत्ति असूनही तें गृह शोभत नाहीं. चक्रादि अंगहीन रथाप्रमाणें अ-सल्या घरांत कोण ज्ञानी पुरुष दीनवत् वस्ति करील बरें?" अर्थात गृहाची खरी शोभा स्त्रियाच आहेत.

---

सर्वाश्रमानुपादाय स्वाश्रमेण कलत्रवान् ॥
व्यसनार्णवमत्येति जलयानैर्यथार्णवं ॥ १ ॥

अर्थ—ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास या तिन्ही आश्र-मांस अन्नअच्छादनादिकांनीं संकटांतून मुक्त करून हे गृहस्थाश्रमी लोक केवळ भार्येच्याच साह्यानें स्वतः आ-पणही हा दुःखरूप संसारसागर ( नौकेनें ज्याप्रमाणें स-मुद्र तरावा त्याप्रमाणें ) सहज तरून जातात.

यामाहुरात्मनो ह्यर्धं श्रेयस्कामस्य मानिनि ॥
यस्यां स्वधुरमध्यस्य पुमांश्चरति विज्वरः ॥ १ ॥

अर्थ—हे मानिनि, ( कश्यपऋषी आपली स्त्री, दिति, हिला ह्मणतात ) स्वकल्याणेच्छु पुरुष पत्नीस स्वकीय देहाचें अर्ध शरीर असें ह्मणतात; कारण कीं, गृहस्था-श्रमसंबंधी सर्व कर्मांत त्यास ती सहाधिकारिणी असते व

तिजवर इहपरलोकांसंबंधी स्वकीय सर्व कार्यभार ठेवून पुरुष निश्चित मनानें व्यवहारांत संचार करीत असतो.

**यामाश्रित्येंद्रियारातीन् दुर्जयानितराश्रमैः ॥**
**वयं जये महेलाभिर्दस्यून्दुर्गपतिर्यथा ॥ १ ॥**

**अर्थ**—जसा एखाद्या किल्याचा अधिपति शत्रूस तेंव्हांच जिंकतो, तसें आह्मी पुरुष तुह्मा स्त्रियांच्या आश्रयानें मन आदिकरून इंद्रियसंबंधी कामक्रोधादि शत्रूंस सहज जिंकून टाकतों. हे शत्रु इतर आश्रमांतील लोकांना जिंकतां येणें अगदीं कठीण असतें.

---

**पुरुषांचा** मोठेपणा काय तो **स्त्रियांच्या** सहवासामुळेंच आहे. स्त्रियांच्या साह्यावांचून पुरुषांचे सर्व व्यापार व्यर्थ आहेत हें अध्यात्मदृष्टीच्या विचार सरणीनें **रामविजयांत** एके प्रसंगीं कसें वर्णिलें आहे तें पहा. **रावणानें सीतेचें** हरण केल्यावर शोकाकुल **रामचंद्र अगस्तिऋषीची** मसलत घेण्याकरितां त्याच्या आश्रमास गेला असतां **अगस्तिऋषीनें** मुद्दाम भेट घेतली नाहीं व त्यास तसेंच परत लावलें. याबद्दल **लक्ष्मणास** त्या ऋषीचा क्रोध आलेला पाहून **रामचंद्रानें** त्याचें समाधान केलें आहे तें असें—

**" मग बोले रघुनंदन ॥ अगस्ति परमसज्ञान ॥**
**तो सीतेवीण माझें दर्शन ॥ सहसाही न घेची ॥ १ ॥**
**मी निर्विकार निर्गुण ॥ *सीता सर्वांसी कारण ॥**

---

* पुरुष आणि प्रकृति मिळून हें जग झालें आहे. माया हें नांव प्रकृतिलाच आहे. व तिच्याच योगानें हा जगपसारा मांड-

तिनें मज जागें करून ॥ सगुणत्वासीं आणिलें ॥ २ ॥
तिणें निर्मून पंचभूतें ॥ त्रिगुण आणि तत्वें समस्तें ॥
अवतार खेळ कौतुकें बहुतें ॥ दावी जनां तेचि पैं ॥ ३ ॥
मी अरूप अनाम निश्चितीं ॥ हें सर्व जाणे अगस्ती ॥
तो ऋषीमाजीं केवळ गभस्ती ॥ तपें ज्ञानें तेजस्वी जो ॥ ४ ॥

पुढे रावणवधानंतर सीते सहवर्तमान अयोध्येस परत जात असतां रामचंद्रानें पुनः अगस्ती ऋषींचे त्यांच्या आश्रमीं जाऊन दर्शन घेतलें. त्यावेळीं पूर्वीची आठवण निघाली असतां अगस्ती ऋषी ह्मणालेः–

" तो विपरीत काळ जाणोन ॥ नाहीं घेतलें तुझें दर्शन ॥
आतां तूं स्त्रीयुक्त सीतारमण ॥ आलों ह्मणून सामोरा ॥ १ ॥
स्त्रीस अवघे देती मान ॥ तूं निर्विकार रघुनंदन ॥
मानापमान विरहीत जाण ॥ सच्चिदानंद परब्रह्म तूं ॥ २ ॥
तूं अजआजित आप्त काम ॥ निरुपाधिक निर्गुण अनाम ॥
नानाविकार समविषम ॥ स्त्रीचे सर्व ही राघवा ॥ ३ ॥

प्रकरण पहिलें समाप्त.

---

ला गेला आहे. स्वतः पुरुष ( अर्थात परमात्मा ) हा निर्गुण निर्विकार आहे. अशा प्रकारची जगदुत्पत्तीची समजूत आमच्या वेदांत विचारसरणीची आहे, तिचेंच सादृश्य स्त्रीपुरुष व्यक्तींवर व त्यांच्या संसारपसाऱ्यावर योजलें ह्मणजे रामानें केलेल्या या भाषणाचा मतलब ध्यानांत येतो.

# स्त्रियांचें कर्तव्यकर्म.

## ( प्रकरण दुसरें. )

—.**:—

*कार्येषु मंत्री करणेषु दासी ॥
भोज्येषु माता, शयनेषु रंभा ॥
धर्मानुकूला, क्षमया धरित्री ॥
गुणैश्च भार्या कुलमुद्धरंति ॥१॥ —सुभाषित.—

" स्त्रिया आणि पुरुष यांचे हक्क व अधिकार समसमान आहेत; केवळ नैसर्गिक कांहीं कमित्वामुळें स्त्रिया पुरुषांपेक्षां कित्येक कर्तव्य गोष्टींत मागें पडोत; परंतु अमुकच गोष्टी स्त्रियांनीं कराव्यात आणि अमुक गोष्टी त्यांनीं करूं नयेत, कारण त्या पुरुषांनीं करावयाच्या आहेत असें ह्मणण्याचा अधिकार कोणालाही नाहीं, "

अशा पद्धतीचे विचार फार सुयुक्तिक रीतीनें प्रतिपादन करणारे कित्येक उदार प्रकृतीचे गृहस्थसुद्धां शेवटीं स्त्रीजनांच्याठायीं कांहीं नैसर्गिक कमित्व आहे असें मुकाट्यानें कबूल करतात. ह्मणजे स्त्रियांच्या मेंदूचें वजन पुरुषांच्या मेंदूहून कांहीं औंसांनीं कमी आहे व त्यांच्या अस्थीचेंही वजन पुरुषांच्या अस्थींहून कमीच आहे; असा अर्वाचीन शारीरशास्त्रवेत्त्यांचा अभिप्राय असल्यामुळें,

* " प्रपंचकृत्यामध्यें पतीला प्रधानासारखी मसलत देणें, गृहकृत्यांत दासीप्रमाणें वागणें, भोजनसमयीं मातेसारखी काळजी घेणें, रतिप्रसंगीं रंभेप्रमाणें सौख्य देणें, धर्मकर्मीं अनुकूलवृत्ति ठेवणें, व सहनशीलतेबद्दल प्रत्यक्ष पृथ्वीची बरोबरी करणें अशा गुणांनीं स्त्रिया आपल्या कुलाचा उद्धार करतात. "

मानसिक व शारीर या दोन्ही शक्तींत अर्थातच पुरुषांपेक्षां स्त्रियांचें नैसर्गिक कमित्व अलीकडच्या विचारसरणीनेंही सिद्ध झालें आहे. आतां कित्येक रानवट स्थितींत असलेल्या स्त्रीपुरुषांना हा सिद्धांत लागू पडणार नाहीं. तसल्या जातींत तर पुरुषांपेक्षां हाडामांसानें स्त्रियाच पुष्कळ बळकट आढळतील. पण त्या लोकांच्या स्थितिरीति प्रमाणास धरून त्यांजवरून सुधारलेले लोक आपले नियममार्ग ठरवीत नाहींत; याकरितां त्यांची गोष्ट सोडून देऊन आपणास तूर्त वरील आपलाच सिद्धांत घेऊन चाललें पाहिजे. तेव्हां आतां त्याच सिद्धांताप्रमाणें स्वाभाविक ठरलेल्या कोमल व सुकुमार स्त्रियांचीं कर्तव्यकर्मे, स्वाभाविकच राकट आणि कंटक असलेल्या पुरुषांहून जर आम्हीं निराळीं अशीं प्राचीन ग्रंथाधारें वर्णन केलीं, तर त्यांत आम्हीं अनुदार, स्वार्थी किंवा कोते विचार प्रकट केले किंवा स्त्रीजनांच्या अधिकारस्वातंत्र्याचा अतिक्रम केला असा आरोप आह्मावर कोणी आणणार नाहीं असें आह्माला वाटतें.

अलीकडील मंडळी स्त्रियांचें स्वातंत्र्य सिद्ध करतां करतां त्यांच्या ठायीं असलेलें जें नैसर्गिक कमित्व व त्यांजवर येणारे सासुरवास—गर्भार—बाळंतपणा सारखे जे पुरुषांहून कांहीं अपरिहार्य प्रसंग शेवटीं अगदीं निरुपायानें कबूल करते, ते आमच्या पूर्ण विचारी व दीर्घदृष्टि पूर्वजांनीं पूर्वींच लक्ष्यामध्यें घेऊन त्यांनीं आमच्या स्त्रीजनांचीं कर्तव्यकर्मे अगोदरच निराळीं ठरवून टाकलीं आहेत. तीं त्यांच्या स्थितिविशेषास तर अत्यंत अनुकूल आहेत. घरा-

बाहेरील विशेष दगदगीच्या आणि जबाबदारीच्या कामां-तून त्यांस अजिबात वगळलें आहे व शांत आणि स्वतंत्र अशा गृह राज्याचा पूर्ण स्वामित्वानें उपभोग घेण्यास त्यांस अधिकार देऊन ठेवला आहे. मत्स्यपुराणांत लिहिलें आहे कीं,—

यतोनिः साधनोधर्मः परिमाणोझ्झितारतिः ॥
धनंजीवित पर्याश्च पतौनार्याः प्रतिष्ठितं ॥ १ ॥

ह्मणजे, "साधनावांचून प्राप्त होण्यास अशक्य असा धर्म, अपरिमित क्रीडादिसुख, व जन्मभर उपजीविकेचें धन ह्या गोष्टी स्त्रियांना पतिपासूनच प्राप्त होत असतात." आपल्यांतील विवाह प्रसंगीं अग्निदेवब्राह्मण यांच्या साक्षीनें नवरामुलगा जी प्रतिज्ञा करीत असतो ती तरी या श्लोका-र्थाप्रमाणेंच असते. जसें—" धर्मेच अर्थेच कामेच नातिच-रामि "—धर्म, अर्थ व काम या तीन गोष्टींत ( या तुमच्या मुलीस ) मी अंतर देणार नाहीं. * "

मनुष्यानें या जगांत येऊन धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार प्रकारचे अर्थ संपादन करावयाचे आहेत अशी आमच्या शास्त्राची आह्मांस शिकवणी आहे. या चतु-र्विध अर्थास ' पुरुषार्थ ' अशी संज्ञा आहे. या संज्ञेचें कारण उघडच आहे कीं, त्यांतील पहिल्या तीन—ह्मणजे धर्म, अर्थ आणि काम—या अर्थांची संपादणी वरील शास्त्रवच-

* " धर्म अर्थ कामेचा ॥ द्विजांप्रति त्रिवाचा ॥
बोलें साक्षीवन्हि आमुचा ॥ मीच इचा सर्वस्वें ॥ १ ॥
मग चित्त वित्त पदार्थ ॥ न वंची वस्तु जात ॥
दोघांचें एकचित्त ॥ न विसंबीन एकमेकां ॥ २ ॥
—गणेशगीता.—

नाप्रमाणें स्वतांकरितां व आपल्या स्त्रीकरितां ही केवळ पुरुषानेंच करावयाची असून पुढें उभयतांनीं एकमेकांच्या साह्यानें चौथ्या अर्थाची ( मोक्षाची ) प्राप्ति करून घ्यावी.

यविरून बहुतेक पतिवरच अवलंबून राहण्यापेक्षां स्त्रियांकडे विशेष कर्तव्यकर्म असें कांहींच राहिलें नाहीं, असें मात्र कोणी समजूं नये. त्या आमच्या गृहराज्यांतल्या स्वामिणी आहेत, तेव्हां त्या राज्यांतला पुष्कळच कारभार त्यांना आटोपावयाचा असतो. त्यांच्या साह्यावांचून संसारगाडा कधींच सुरळीत चालावयाचा नाहीं. एके ठिकाणीं लिहिल्या प्रमाणें–

सामर्थ्य द्रव्य कांताचें ॥ उपसाहित्य द्रव्य स्त्रियांचें ॥ हीं दोन्ही मिळून प्रपंचाची व्यवस्था लागावयाची असते. व ती योग्यरीतीनें लागावी याकरितां स्वतः स्त्रीजनांचीं कर्तव्यकर्मे वेगळींच ठरवलेलीं आहेत.

लहानपणीं मातापितरादि पालकांच्या आज्ञेंत वागून त्यांजपासून प्रपंचोपयोगी असें सर्व प्रकारचें शिक्षण घेणें; विवाहानंतर सासूसासऱ्यांच्या दिमतीस जाऊन त्यांच्या प्रेमपुरःसर शिक्षेनें ज्या घरीं व विशेषतः ज्यांच्या सहवासानें आपला उर्वरित आयुष्यक्रम जावयाचा आहे त्या घरचे रीतरिवाजांची व त्या माणसांच्या स्वभावादिकांची ओळख करून घेणें; आणि पुढें पतीच्या अधिकारांत गेल्यानंतर दक्षतेनें त्याचा संसार चालविणें, भक्तीनें त्याची शुश्रूषा करणें, प्रेमानें त्यांशीं वर्तन ठेवणें, व अनन्य भावानें त्याच्या धर्मादिकृत्यांत त्यास साह्यभूत होऊन चौथा पुरुषार्थ जो मोक्ष त्याची उभयतांनीं प्राप्ति करून

घेण्याची तयारी करणें हींच मुख्यतः स्त्रियांचीं सामान्य कर्तव्यकर्मे आहेत.

प्रपंचोपयोगी शिक्षण ह्मटलें ह्मणजे त्यांत पुढें दिलेल्या विषयांचा स्थितिविशेषाचे मानानें अंतर्भाव करतां येईल असें आह्मास वाटतें. लिहितांवाचतां येणें, हिशेबठिशेब समजणें, संसारकामाची माहिती असणें, स्त्री जातीस विशेष शोभणारें कांहीं कलाकौशल्य आंगीं असणें, व धर्मनीतींचें तत्व वर्तनविचारांत पूर्णपणें बिंबलेलें असणें. हें शिक्षण होतां होईल तितकें घरघराहू आणि वडील किंवा आप्त माणसांकरवींच मिळेल तितकें फार बरें. आजच्या लोकस्थितीला ह्या प्रकारच्या शिक्षणासाठीं एखाद्या अन्यस्थानाची अपेक्षा करण्यास आह्मी कांहीं तयार नाहीं. स्त्रीच्या वागण्यांत कायमचे रीतरिवाज येणें ते सासरच्याच मोळ्यानें आले पाहिजेत. कारण तिचें शेष आयुष्य त्याच घरीं व तेथीलच माणसांच्या सहवासानें जावयाचें असतें. याकरितां मर्यादा, टापटीप, गुरुजनशुश्रूषा, उद्योगतत्परता, सहनशीलता, पातिव्रत्यनिष्ठा वगैरे उत्तम गुणांची शिक्षा स्त्रीला तिच्या सासुचेच हाताखालीं लागणें योग्य आहे. एथून पुढच्या स्थितींत त्यांना जरा स्वतंत्रतेनें वागावयाचें असतें, कांहीं मोठेपणाचे अधिकार उपभोगावयाचे असतात व संसारभार वाहण्याचे अर्धे श्रम एकदम आंगावर घ्यावयाचे असतात. हीच कायती त्यांना कसोटीची वेळ आहे व पूर्वस्थितींत प्राप्त करून घेतलेल्या गुणांचें चीज याचवेळीं व्हावयाचें असतें. जिच्या आंगीं ते गुण पूर्वस्थितींत असतां सासर माहेरच्या मोळ्यानें चांगले बाणले

गेले असतात तिजकडून या निबंधाचे आरंभीं दिलेल्या श्लोकांत वर्णिल्या प्रमाणें उत्तम प्रकारें संसार चालविला जाऊन ती आपल्या कुलास भूषणप्रद होते व वृद्धचाणाक्यांत एक श्लोक* आहे त्यांत सांगितल्या प्रमाणें भार्या ह्या नांवास तरी तीच कर्तव्यकुशल स्त्री पात्र होते.

प्रपंचदक्षता व पतिसेवा ह्यां खेरीज उत्तर स्थितींतल्या स्त्रियांचें आणखी एक कर्तव्यकर्म सांगावयाचें राहिलें आहे. तें बालसंगोपन हें होय. जन्मदातृत्वामुळें स्त्रियांच्या ठायीं आपल्या तान्हुल्याविषयीं नैसर्गिक प्रेमपान्हा असतोच. तेव्हां संगोपन ह्मणजे 'संरक्षण' एवढ्याच अर्थानें त्यांस त्यांचें कर्तव्य आह्मांला सुचविण्यास नको आहे. ती काळजी त्यांना स्वाभाविकच आहे. परंतु संगोपन याचा अर्थ आह्मी इतका व्यापक करितों कीं, त्यांत मुलांच्या प्राथमिक गृहशिक्षणाचाही अंतर्भाव व्हावा. या कर्तव्या संबंधानें आह्मी स्त्रीवर्गास जें विशेषेंकरून बजावणार आहों तें याच शिक्षणाविषयीं होय. मुलांना कळूं वळूं लागल्यापासून त्यांना शिक्षण पाहिजे असतें. मात्र तें शिक्षण प्रेमानें आणि त्यांच्या नादानादानें त्यास दिलें गेलें पाहिजे. शाळेचा किंवा पंतोजीचा धाक त्याजवर बिलकूल बसतां कामा नये. या करितां असें शिक्षण ह्मटलें ह्मणजे तें गृहशिक्षणच होय व तें गृहशिक्षण त्यांना स्त्रियांकडूनच मिळालें पाहिजे. स्वच्छ-

---

* सा भार्या या शुचिर्दक्षा, सा भार्या या पतिव्रता ॥
सा भार्या या पतिप्रीता, सा भार्या सत्यवादिनी ॥ १ ॥

अर्थ—पवित्र, संसारदक्ष, पत्येकनिष्ठ व सत्यभाषिणी अशी स्त्रीच 'भार्या' ह्मणजे पोषण करण्यास योग्य होय.

तेची आवड, सत्यनिष्ठा, प्रेमबुद्धि, उद्योगाची हौस, गुरुजनां- विषयीं पूज्यता, सहनशीलतेची संवय, परमेश्वराची भीति इत्यादि सद्गुणांचें थोडें थोडें बीजारोपण बालकांच्या शुद्ध व कोमल अंतःकरणांत करण्याचें स्त्रियांना जसें साधणार आहे तसें तें इतरांस साधणें कठीण आहे; या करितां ही जबाबदारी स्त्रियांकडेच असावी हें बरें. हें कर्तव्य त्यांचेंच आहे. हें प्रतिष्ठित व श्रेष्ठ कर्तव्यकर्म आहे. आमच्या स्त्रिया हें आपलें कर्तव्यकर्म जों जों उत्तमप्रकारें बजाव- तील तों तों समाजांत त्यांची योग्यता व मानमान्यता सहजगत्या जास्त वाढणार आहे. व स्त्रिया ह्मटल्या ह्मणजे, देशांतल्या लोकसंख्येपैकीं एक मोठा थोरला निरुपयोगी वर्ग, असा जो त्यांजवर आमच्या देशांत आरोप आहे तो ढळला जाईल. ह्या करितां ह्या विशेष कर्तव्यकर्मास स्त्रियां- नीं जागून जगा पुढें पुष्कळशीं वळणशुद्ध व सुसंस्कृत माणसें आणून सोडण्याचें आद्यश्रेय त्यांचें त्यांनीं आपलें मिळवावें अशी आमची सर्व स्त्रीजनांस प्रेमबुद्धीनें सूचना आहे.

प्रकरण दुसरें समाप्त.



# स्त्रियांचें भूषण.

## ( प्रकरण तिसरें. )

———:०:———

*भक्तिः प्रेयसि संश्रितेषु करुणा श्वश्रूषु नम्रं शिरः ॥
प्रीतिर्यातृषु गौरवं गुरुजने क्षांतिः कृतागस्यपि ॥
अम्लानां कुलयोषितां व्रतविधिः सोयं विधेयः पुन–
र्मद्भर्तुर्दयिता इति प्रियसखी बुद्धिः सपत्नीष्वपि ॥ १ ॥
–सुभाषित–

सद्गुण हे कोणत्याही स्थळीं असले तरी त्या स्थळास ते शोभा आणीत असतातच; परंतु त्यांतूनही कित्येक सद्गुण असे आहेत कीं, ते विवक्षित स्थळीं फारच नामी दिसत असतात. अशा त्या विशेष सद्गुणांस त्या त्या स्थळाचीं तीं भूषणें होत असें ह्मणण्याचा परिपाठ आहे. त्याप्रमाणें आमच्या स्त्रीजनांचीं कांहीं भूषणें आम्ही येथें लिहीत आहों. स्त्रियांनीं त्यांचें मनन करून तीं आपलीं भूषणें घेऊन जावींत व तीं यथास्थळीं आपल्या आंगीं बागवून लक्ष्मीप्रमाणें सदासर्वकाळ आलंकृत दिसावें अशी आमची इच्छा आहे.

---

*"साध्वी स्त्री आपल्या प्रियपतीवर भक्ति ठेवते, आश्रितांवर दया करते, सास्वांशीं नमून वागते, जावांवर प्रेम करते, सासरा इत्यादि वडील माणसांच्या ठिकाणीं पूज्यभाव धरते, चाकरमाणसांनीं अपराध केला तरी त्यांची क्षमा करते, फार काय सांगावें, प्रत्यक्ष सवतीला देखील ती आपल्या प्रियपतीची आवडती आहे असें समजून तिला मैत्रिणीसारखी लेखते. तात्पर्य अशा प्रकारचें वर्तन ठेवणें हें कुलस्त्रियांचें व्रत आहे.'

शालीनता ह्मणजे उत्तमस्वभाव किंवा सौजन्य हें स्त्रियांचें मुख्यभूषण मानलें आहे. या भूषणानें मंडित असलेल्या स्त्रीची प्रशंसा ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं आढळते. पुष्पभारानें फुललेली वेली ज्याप्रमाणें मनास आल्हाद उत्पन्न करते, त्याचप्रमाणें सुशीलता या भूषणानें अलंकृत स्त्री सुप्रसन्न दिसते आणि खरेंच आहे; मागच्या निबंधांत सांगितलेलीं स्त्रियांचीं कर्तव्यकर्मे लक्ष्यांत आणलीं ह्मणजे त्यांजकडून तीं उत्तम प्रकारें पाळलीं जाण्यास सुस्वभाव हा भूषणावह गुण स्त्रियांना अत्यंत अवश्य आहे यांत संशय नाहीं. हेंच पहा कीं, दाराबाहेरची दगदग जिच्या प्रसन्न मुखाकडे पाहून विसरावयाची आहे, कुटुंबभरण चिंतचा दुःसह ताप जिच्या सुखकर सहवासानें सहन करावयाचा आहे, गृहराज्यांतील भिन्न भिन्न वृत्तींच्या अल्प थोर वयस्क प्रजेचें नियंतृत्व जिच्या ममताळूपणावर सोंपवून दिलेलें असावयाचें, आणि जिच्या उल्हासपूर्ण वावरण्यानें गृहमंदिरास विलक्षण प्रकारची शोभा यावयाची आहे, अशा स्त्रियेच्या ठायीं सुशीलतेची आवश्यकता किती तरी आहे ह्मणून सांगावी ? या एकाच गुणाच्या अभावीं वरील सर्व जरूरीच्या गोष्टींवर पाणी पडणार नाहीं काय ? ज्या कुटुंबांतील स्त्रिया शीलसंपन्न नाहींत तेथील पुरुषांना, स्वभावतःच कष्टप्रद जे व्यापारधंदे त्यांजविषयीं उत्साहवृत्ति राहत नाहीं; कुटुंबभरणचिंता अतिशय पीडा करूं लागते; गृहराज्यांत कलहाग्नि धुमसत असतो व गृहमंदिराची सर्व शोभा जाऊन त्यास स्मशानभूमिसदृश केवळ उदासीनता येते !

वास्तविक पाहिलें असतां मानसिक दुर्विकारांस क्षुब्ध करणारे प्रसंग पुरुषांपेक्षां आमच्या स्त्रियांच्या व्यवहारांत फारच कमी असतात; किंबहुना नाहींतच ह्मटलें तरी चालेल. त्यामुळें त्यांची शीलसंपन्नता नष्ट होण्याचा सहसा संभव नसावा. परंतु अज्ञानातिशयानें व निरर्थक व्यापारांत मन घालण्याची संवय ठेवल्यानें, स्त्रिया, आपल्या ठायीं साहजिक राहणाऱ्या सुशीलतेस मुकून कृत्या, कलहप्रिया, क्रोधमुखी, हट्टी वगैरे दुर्विशेषणांस पात्र होतात व स्वतां-च्या त्याचप्रमाणें दुसऱ्याच्याही संसाराचें मातेरें करून टाकण्यास मात्र कारण होत असतात. याकरितां स्त्रियांनीं हा गुण आंगीं राखण्याविषयीं नेहमीं दक्ष राहून " शील भारवती कांता " हें आपलें भूषणावह नांव गमावूं नये हेंच त्यांना पुनः येथें सांगणें आहे.

'शील' ह्मणजे काय, ह्मणून धर्मराजानें एकदां भी-ष्मास प्रश्न केला होता त्याचें उत्तर देतांना भीष्मांनीं एक लहानशी कथा धर्मास सांगितली. तिचा आह्मी या ठिकाणीं अनुवाद केला असतां 'शीला'चें स्वरूप, तें आंगीं आणण्याचीं साधनें व त्याजपासून उपयोग हीं आमच्या स्त्री वाचकांच्या ध्यानांत चांगल्या प्रकारें येतील असें वाटतें. ती कथा अशी. दुर्योधनराजा स्वतः परम भाग्यशाली असतांही एकदां पांडवांचें किंचित् ऐश्वर्य पाहून त्यास फार वाईट वाटलें. या वाईट वाटण्याचें कारण त्यानें आपला पिता, धृतराष्ट्र, यास विचारतां धृतराष्ट्रानें सांगितलें कीं, बाबारे तूं शीलसंपन्न हो; ह्मणजे दुसऱ्याचें कसलेंही वैभव पाहून तुझ्या मनांत विषमभाव उत्पन्न हो-

णार नाहीं, इतकेंच नव्हे तर, स्वतः तुझेंही यशऐश्वर्य वृद्धिंगतच पावेल. एतद्विषयीं तुला एक गोष्ट सांगतो ती ऐक. मागें प्रल्हाद दैत्यानें इंद्रापासून त्रैलोक्याचें राज्य हरण करून घेतल्यावर तें आपलें राज्य आपणास परत मिळण्याचा उपाय काय हें विचारण्याकरितां इंद्र देवगुरु बृहस्पति यांजकडे गेला. तेव्हां बृहस्पतीनें सांगितलें कीं, प्रल्हाद शीलसंपन्न आहे. तेवढी शीलसंपन्नता जर तूं त्याजपासून प्राप्त करून घेशील तर तुझें ऐश्वर्य पुनः तुला प्राप्त होईल. गुरूचें हें वाक्य श्रवण करून इंद्र ब्राह्मणवेषानें जाऊन कित्येक वर्षें प्रल्हादाचे सेवेस राहिला. उत्तम प्रकारें सेवा करीत असतां एकेदिवशीं प्रल्हाद सुप्रसन्न होऊन ब्राह्मणरूपी इंद्रास ह्मणाला कीं, तुला जें अपेक्षित असेल तें माग. तुझी एकनिष्ठ सेवा पाहून मला संतोष झाला आहे, तेव्हां तुझी इच्छा पुरवून तुला कृतार्थ करावें असें माझ्या मनांत आहे. इंद्रानें विचारलें कीं, महाराज आपण हे त्रैलोक्याधीश पद कशाच्या योगानें मिळविलेंत हें मला सांगावें. प्रल्हाद ह्मणाला, हें पद केवळ आमच्या शुक्राचार्य गुरुमहाराजांची मजवर कृपा होय. मी कधींही उन्मत्तपणानें वागलों नाहीं, गुरुजनांचा अनादर केला नाहीं, शुक्राचार्य सांगतात त्या नीतिमार्गाचें अतिक्रमण केलें नाहीं, व ब्राह्मणांना तिळमात्र पीडा दिली नाहीं. तेव्हां हें सर्व ऐश्वर्य केवळ शुक्राचार्यांच्या नियमनाचें फळ होय. तूं ही माझी उत्कृष्ट सेवा केली आहेस याकरितां तुला काय पाहिजे असेल तें माग. इंद्र ह्मणाला, महाराज, मला दुसरें कांहीं नको. आपणापाशीं

जें उत्तम शील आहे तेवढेंच मला द्या म्हणजे झालें. प्रल्हादानें बरें आहे असें म्हणतांच त्यास नमस्कार करून ब्राह्मणरूपी इंद्र निघून गेला. काहीं वेळानें एक मोठा तेजस्वी पुरुष प्रल्हादाचे शरीरांतून बाहेर पडला. त्यास तूं कोण म्हणून प्रल्हादानें विचारतां तो पुरुष म्हणाला कीं, माझें नांव 'शील' आहे. तूं माझा त्याग केल्यामुळें आतां त्या ब्राह्मणाचे शरीरांत मी जाऊन राहतों. असें म्हणून तो अंतर्धान पावल्यावर आणखी एक त्याचे सारखाच तेजस्वी पुरुष प्रल्हादाचे शरीरा बाहेर पडला. त्याचें नांव विचारतां, मी धर्म असून जेथें शील राहतें तेथेंच माझी वस्ति, तेव्हां शीलाबरोबर मीही आतां या ब्राह्मणाचेच शरीरांत जाऊन राहणार असें सांगून तो अंतर्धान पावला. त्याचे मागून आणखीं एक तिसरा पुरुष निघाला. त्याचें नांव सत्य, व शील, आणि धर्म जेथें गेलें तेथेंच मी जातों असें म्हणून तो गुप्त झाला. नंतर चवथा एक पुरुष निघाला. त्याचें नांव सद्वृत्त, तोही त्याचप्रमाणें सांगून गुप्त झाला. इतक्यांत मोठा शब्द होऊन पांचवा एक पुरुष बाहेर पडला. त्याचें नांव बल होतें. तो गेल्यावर महातेजस्विनी अशी एक सुंदर स्त्री प्रल्हादाचे शरीरांतून बाहेर आली. तिनें आपलें नांव लक्ष्मी असें सांगितलें; व ज्या ठिकाणीं शील, धर्म, सत्य, सद्वृत्त व बल हे असतात त्याच ठिकाणीं मी स्थीरत्वानें राहते; तूं त्या सर्वांचा त्याग केलास तेव्हां मीही तुला सोडून त्या ब्राह्मणाकडे चालल्यें असें सांगून तीही अंतर्धान पावली. सारांश, भीष्म सांगतात कीं धर्मा, धृतरा-

ष्ट्राची ही कथा ऐकून शीलसंपन्नतेची योग्यता दुर्योधनाचे लक्ष्यांत आली व " शील " ह्मणजे काय असा त्यानें पुनः प्रश्न केला. त्याचें संक्षेपतः उत्तर धृतराष्ट्रानें दिलें तें असें. कायावाचामनेंकरून कोणाचाही द्रोह करूं नये. दया व धर्म हीं यथाशक्ति नेहमीं करीत असावीं. कोणाचें प्रत्यक्ष अगर परोक्ष अहित होईल असें कर्म वर्ज्य करावें व चांगली कीर्ति होईल अशाविषयीं प्रयत्नवान् असावें याचें नांव 'शील.'

या लहानशा चुटक्यावरून शालीनतेविषयीं आह्मी स्त्रीजनांस प्रारंभीं इतका जो आग्रहाचा उपदेश केला त्याचें कारण लक्ष्यांत येईल.

लज्जा किंवा मर्यादा हाही स्त्रियांना भूषणप्रदच गुण गणला आहे. * मुलीचें लग्न झालें कीं तिला या गुणाचें शिक्षण देण्यास प्रारंभ होत असतो. अलीकडच्या दृष्टीनें कित्येक विचार करणारांस, मुलींना लाजावयास शिकविणें हें अगदीं मूर्खपणाचें आहे असें वाटत असतें; आणि तें शिकविण्याचा वास्तविक उद्देश न समजल्यानें हें मर्यादशीलपणाचें शिक्षण देण्यांत आणि स्वीकारण्यांतही कित्येक ठिकाणीं जो अडाणीपणा व अतिशयपणा आढळण्यांत येतो त्यामुळें त्याजवर जरा मूर्खपणाचा आरो-

---

* शोभंते विद्यया विप्राः क्षत्रिया विजयश्रिया ॥
श्रियोऽनुकूलदानेन लज्जयाच कुलांगनाः ॥ १ ॥

अर्थ—विद्येच्या योगानें ब्राह्मणांस शोभा येते; विजय प्राप्त झाल्यानें क्षत्रियांस शोभा येते; सत्पात्रीं दान केल्यानें लक्ष्मीस शोभा येते व लज्जेनें स्त्रिया शोभतात. "

पडी येतो खराच. लाजावयाला शिकवावयाचें ह्मणजे नवराबायकोस एकमेकांचा इतका बाऊ करून ठेवावयाचा कीं त्यांनीं एकमेकांकडे प्रत्यक्ष मुखानें पाहूं नये, इतकेंच नव्हे, तर नवऱ्याचा पुढल्या दारीं शब्द ऐकला कीं बायकोनें मागल्यादारीं हातचें काम टाकून पट्कन उठून कोंपरा धरावा ! असले विचित्र प्रकार कोठें कोठें पाहण्यांत येतात खरें, पण एवढ्यानें आह्मी हा भूषणावह स्त्रियांचा गुण अलीकडच्या मताप्रमाणें रानटी समजून मुळींच नष्ट करून टाकण्यास बिल्कुल तयार नाहीं. आमच्या अल्प समजुतीप्रमाणें सलज्जता हें स्त्रियांचें भूषणच आहे. नुसतें भूषणच नव्हे, पण फार तर काय, त्यांचें तें एक उत्तम प्रकारचें संरक्षणही आहे. याकरितां स्त्रियांपासून तें काढून घेऊन त्यांस तसल्या विभूषितपणें मोकळे संचार करूं देणें हें त्यांची एक प्रकारें हानिच * करण्यासारखें आहे असें आह्मीं ह्मणतों. आतां या गुणाचा वास्तविक उद्देश जो-विनम्रतेचें शिक्षण + हा-तो त्यांना समजून देणें हें मात्र अगदीं अवश्य आहे व तसा तो त्यांस नीटपणें समजून दिला असतां, हल्लीं कित्येक ठि-

---

* " तावत्कुलस्त्रीमर्यादा यावल्लज्जावगुंठनम् ॥
हतेतस्मिनकुलस्त्रीभ्यो वरंवेश्यांगनाजनः ॥ १ ॥

**भावार्थ**—जोंपर्यंत स्त्रिया सलज्ज आहेत तोंपर्यंतच त्यांची मर्यादा राहते. एकदां त्या निर्लज्ज बनल्यावर त्यांच्यांत आणि वेश्याजनांत अंतर कोणतें ?

\+ (साकी)-सलज्जता ही विनम्रतेची शिक्षा अगवधूते ॥
पोरबुद्धिचे प्रमाद कश्मल सलज्जा ती धूते १

कार्णी होतो त्याप्रमाणे अगदींच केवळ मूर्खपणानें या गुणाची योजनाही होणार नाहीं अशी आह्मास पक्की खात्री आहे.

स्त्रियांचें तिसरें भूषण ह्मटलें ह्मणजे पातिव्रत्य हें होय. आमच्या देशांतील प्राचीन स्त्रियांचीं चरित्रें ( ह्यांपैकीं कांहीं पुढच्या एका प्रकरणांत दिलींच आहेत तीं ) पाहिलीं असतां हें भूषण त्यांच्या ठिकाणीं जणूं काय उपजतच आहे असें वाटतें व त्याबद्दल आह्माला मोठा अभिमान वाटतो. आमचें राज्य गेलें, स्वातंत्र्य गेलें, धन गेलें, वैभव गेलें सर्व कांहीं जाऊन आह्मास दुसऱ्यांनीं केवळ सद्दीच्या जोरावर जरी एखादेवेळीं खालीं पाहण्यास लावलें तरी, कित्येक 'दुर्धारकां' च्या नादानें आजकालच्या कोणी 'हिंदु लेड्या' आमच्या देशच्या स्त्रियांची अब्रू समूळ नष्ट करून टाकीपर्यंत या एका गुणांत तरी आमच्या स्त्रिया परकीय लोकांना लाजवून खचित माना खालींच घालावयास लावतील यांत शंका नाहीं ! 'पतिकरी अपुल्या पतिच्या सुता' असला * पशुव्यवहार कोणी-

---

* "विलायतेस हॉफकिन्स नांवाच्या मनुष्यानें कांहीं दिवसांपूर्वीं कोणा मिस्ट्रेस हॅमिल्टन् नांवाच्या विधवा स्त्रीशीं लग्न लावलें. या दंपत्यास एक पुत्र झाल्यावर दोघांत बेबनाव होऊन हाफ्किन्स यानें तिला काडी मोडुन दिली. पुढें या रिकाम्या झालेल्या नवरदेवानें त्या आपल्या बायकोच्याच ( पूर्व नवऱ्यापासून संपादिलेल्या ) मुलीशीं लग्न लावलें ! व तिलाही त्याजपासुन एक मुलगा झाला. आतां हॅमिल्टन् बाई ह्या त्याजवळ येऊन राहिली असल्यामुळें ह्या विचित्र कुटुंबांत नात्यांचा जो कांहीं गोंधळ उडुन गेला आहे तो अपूर्वच ! हीं सुधारलेलीं नातीं आतां वाचकांनीं फुरसतीच्या वेळीं खुशालपणीं लावीत बसावें. आह्मी या ठिकाणीं जास्त जागा आडवीत नाहीं. कशी विलायती सुधारणा आहे एवढेंच सांगावयाचें !"

कडे, आणि आमच्या इकडील एकपतिभुक्ता कोणीकडे. केवळ करारानें एकत्र राहिलेलीं नामधारी नवराबायको कोणीकडे, आणि आमचीं देवाग्निब्राह्मणांच्या साक्षीनें मंगलसूत्रबद्ध जोडपीं कोणीकडे; तसेंच केवळ खुषीचाच सौदा * करणारीं दंपत्यें कोणीकडे, आणि वेलीप्रमाणें पतिरूप वृक्षास लपेटून राहिलेली स्त्रीपुरुषांची जोडी कोणीकडे! तेव्हां हा अंकूर आमच्या स्त्रियांत स्वाभाविक आहे. याकरितां त्याजविषयीं येथें विशेष विस्तार करून कांहीं जास्त सांगावयास नको आहे. मात्र तो त्यांच्यांतील अंकूर कांहीं आगंतुक कारणांनीं कोमेजून जाऊं नये ह्मणून त्याजविषयीं त्यांना वरचेवर सावध करण्याकरितां पतिव्रताधर्मप्रशंसापर दोन तीन निवडक उतारे ह्या ठिकाणीं देऊं ह्मणजे पुरे.

ओव्या.

—कुलवधूचें आचरण—

सर्व स्त्रियांचें स्वधर्माचरण। भावें करावें पतीचें सेवन॥
तें न करितां तयासी पतन। होय पूर्ण रौरवीं॥१॥
+पाद पडतां फणिफणावरी। जेवी भय संचरे अंतरीं॥
तेवी भय वाटे जातां बाहेरी। ती ओळखावी कुलवधू॥२॥

* अमेरिकेकडे हल्लीं असा एक विचार निघाल्याचें कळतें कीं स्त्रीपुरुषांचा संबंध केवळ खुषीचा असावा. जोंपर्यंत परस्पराची खुषी आहे तोंपर्यंत त्यांनीं नवराबायकोच्या नात्यानें राहावें नाहीं तर खुशाल संबंध सोडून पाहिजे तर दुसरीकडे सौदा जुळविण्यास स्वतंत्र व्हावें! खूप नामी!

+ पदन्यासो गेहाद्बहिरहि फणारोपणसमो॥
निजावासादन्यद्भवन मपरद्वीपतुलितम्॥

पति सेवेवांचून अन्य । जियेसी नावडे धर्माचरण ॥
तदनुज्ञें करी तीर्थव्रतदान । जाणावी कुलवधू ॥ ३ ॥
भ्रतारविरहें अति दुःखित । तदागमनीं हर्षयुक्त ॥
प्रेमें सेवी पतिवचनामृत । तीच जाणावी कुलवधू ॥४॥
जैवी छाया शरीर संगें । तैंवी भ्रतार सेवेसीं जागे ॥
भ्रतारवचनें सद्गदित मागें । तीच जाणावी कुलवधू ॥५॥

—मुक्तेश्वर—

## —पतिव्रता धर्म—

पतिव्रतेचें आचरण । सांगे गुरु विस्तारेंन ॥
पुरुष सेवितां प्रसाद जाण । मुख्य भोजन स्त्रियेसी ॥१॥
असतां गृहीं पुरुष । शृंगार करणें अतिहर्ष ॥
ग्रामा गेलिया पुरुष । शृंगार आपण करूं नये ॥२॥
*पतियेतां बाहेरूनी । सामोरी जाय तत्क्षणीं ॥

---

वचोलोकालभ्यक्रृपण धनतुल्यंमृगदृशाः ॥
पुमानन्यःकांताद्विधुरिवचतुर्थीसमुदितः ॥ १ ॥

---

*अभ्युत्थानमुपागते गृहपतौ तद्भाषणे नम्रता ॥
तत्पादार्पितदृष्टिरासनविधिस्तस्योपचर्या स्वयम् ॥
सुप्ते तत्रशयीत तत्प्रथमतो जह्याच्च शय्यामिति ॥
प्राच्यैः पुत्रि निवेदितः कुलवधूसिद्धांत धर्मागमः ॥ १ ॥

—सुभाषित—

अर्थ—पति बाहेरून आला असतां त्यास अभ्युत्थान देऊन त्याशीं नम्रतेनें भाषण करावें, त्याच्या पायांकडे दृष्टि दिलेली असावी, त्याची सेवा करावी, तो निद्रित झाल्यावर आपण निजावें, तो उठण्याच्या पूर्वीं आपण हांतरूण सोडावें, असें हें कुलस्त्रीचें सिद्धांतरूप धर्मशास्त्र, हे कन्ये, पूर्वदेशस्थांनीं निवेदन केलें आहे.

सकळ कामें त्यजूनी । सन्मुख जाय पतीच्या ॥ ३ ॥
पुरुष आयुष्य वर्धनार्थ । कुंकुम लावावें मुख्यार्थ ॥
शेंदूर काजळ कंठसूत्र । फणी माथां असावी ॥ ४ ॥
तांबूल घ्यावें सुवासीनीं । असावी तिचे माथां वेणी ॥
करीं कंकणें तोडर चरणीं । पुरुषा समीप येणेंपरी ॥५॥
पुरुष निंदक स्त्रियेशीं । न बोलावें तियेशीं ॥
बोलतां दोषघडे तिशीं । पातिव्रत्य भंगे जाणा ॥ ६ ॥
आंग धुवूं नये नग्नपणें । उखळ मुसळीं न बैसणें ॥
पायीं विरवल्याविण जाणें । फिरूं नये पतिव्रतें ॥७॥
जातें उंबऱ्यावरी देखा । बैसूं नये वडिलां संन्मुखा ॥
पतिव्रता लक्षण ऐका । येणेंपरी असावें ॥ ८ ॥
पतीचे मनीं जी आवडी । तींच ल्यावीं लेणीं लुगडीं ॥
पति दुश्चित असतां घडी । आपण शृंगार करूं नये ॥९॥
जितुकें मिळालें पतीशीं । संतुष्ट असावें मानसीं ॥
समर्थ पाहोनी कांक्षेसी ॥ पतिनिंदा करूं नये ॥१०॥
भूमिदेवी ऐसें ह्मणें । पतिव्रतेच्या पवित्र चरणें ॥
आपणावरी चालतां क्षणें । पुनीत मी ह्मणतसे ॥११॥
सूर्य चंद्र ऐसें ह्मणती । आपुलीं किरणें ज्योती ॥
जरी पतिव्रतेवरी पडती । तरी आपण पावन होऊं ॥१२॥
*घरोघरीं स्त्रिया असती । काय करावी लावण्य संपत्ति ॥

---

*रूपसंपन्नमग्राम्यं प्रेमप्रायं प्रियंवदम् ॥
कुलीनमनुकूलं च कलत्रं कुत्र लभ्यते ॥ १ ॥
अर्थ- रूपवान्, सुलक्षणी, प्रेमळ, मधुरभाषिणी, कुलीन आणि पतीशीं अनुकूल अशी भार्या कुठें आढळेल बरें? क्वचित फार विरळा.

जिचेनि वंश उद्धरती । तैशी स्त्री असावी कीं ॥१३॥
ज्याचे घरीं पतिव्रता । दैवें आगळा तो पुरुष तत्वतां ॥
करावें सुकृत जन्मशता । तरीच लाभे ऐशी सती ॥१४॥
चतुर्विध पुरुषार्थ देखा । स्त्रियेच्या संगती लाधे लोकां ।
पतिव्रता सती अधिका । पुण्यानुसार लाभे जना ॥१५॥
जितुक्या पतिव्रता नारी ॥ समस्त भागीरथी सरी ॥
त्यांचे पुरुष शंकरापरी । पूजा करावी दोघांची ॥१६॥

—श्रीगुरुचरित्र—

## —गृहिणी स्त्रिचें लक्षण—

शकुन्तला सासरीं जावयास निघाली असतां कण्वऋषीनीं तिला उपदेश केला आहे. त्यांत स्त्रीनें कोणत्या प्रकारें वागलें असतां 'गृहिणी' हें नांव तिला प्राप्त होईल तें येणें प्रमाणें सांगितलें आहे.—

शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखी वृत्तिसपत्नीजने ॥
भर्तुर्विप्रकृतापि रोषणतया मास्मप्रतीपं गमः ॥
भूयिष्ठं भवदक्षिणा परिजने भाग्येष्वनुत्सेकिनी ॥
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ॥१॥

अर्थ—घरांतील वडील माणसांची सेवा करीत जा. सवतीशीं मैत्रिणीप्रमाणें वागत जा. पति जरी रागावला तरी त्याशीं उलट उत्तरें देऊन बोलत जाऊं नकोस. सेवक जनांशीं सुशीलतेनें असत जा. आणि मोठें वैभव प्राप्त झालें तरी गर्व होऊं देऊं नकोस. अशारीतीनें ज्या स्त्रियांची वर्तणूक आहे त्यास 'गृहिणी' या नांवास

पात्र आहेत. बाकीच्या केवळ कुळाला लांछन लावणाऱ्या कुलटा होत. "*

आतांपर्यंत स्त्रियांचीं जीं तीन भूषणें सांगितलीं तीं संपूर्ण स्त्रियांना आपल्या अंगीं आणतां येण्यासारखीं आहेत. तीं सगळ्यांच्या ठिकाणीं अवश्य असलींच पाहिजेत. परंतु ह्या पुढील चौथें भूषण जें आह्मी सांगणार आहों तें जरी स्त्रीजनांचेच ठिकाणीं विशेष करून खुलण्यासारखें आहे तरी त्याचा संग्रह सर्वांसच करून ठेवतां येईल कीं नाहीं, याजबद्दल संशय आहे. आह्मी याठिकाणीं तेंही भूषण सांगून ठेवतोंच; ऐपतीप्रमाणें आमचा स्त्रीवर्ग त्याचा उपयोग करून घेवोत.

ललितकला हें स्त्रियांचें चौथें भूषण होय. या भूषणाचे वेगवेगळे असे दोनचार पोटभेद आह्मी करतों. ते शिवणकला, चित्रकला, गायनवादननृत्यकला वगैरे या कला आमच्या स्त्रियांना अगदींच अश्रुतपूर्व आहेत असें नाहीं. आजकालसुद्धां त्यांचे कांहीं एक प्रकार आमच्यांत असून संसारांत त्यांजपासून आह्मी नुसती क-

---

* स्वयंवर झाल्यानंतर श्रीरामचंद्राबरोबर सीता अयोध्येस जाण्यास निघाली; तेव्हां जनकाच्या स्त्रियांनीं तिला बोध केला आहे तोही असाच आहे.

श्वश्रूशुश्रूषणपरा नित्यंराममनुव्रता
पातिव्रत्यमुपालंब्य तिष्ठवत्सेयथासुखम् ॥

अर्थ–हे मुली, नित्यशः सासूसासऱ्याच्या सेवेंत तत्पर असत जा; रामचंद्राचें मनोदयानुरूप वर्तन ठेवीत जा. व पातिव्रत्य धर्माचें अवलंबन करून सुखानें सासरीं ऐस." किती गोड उपदेश हा!

मणूक नव्हे, तर उपयोगही करून घेत आहों. तरी पण या कलांमध्यें सोय असेल त्या स्त्रियांची गति जास्त झाली पाहिजे असें आह्माला वाटतें. चोळ्यापरकर, किंवा आंगडीं कुंचडीं एवढ्यांतच स्त्रियांची शिवणकला न राहतां नानाप्रकारचे कशिदे काढणें, नवीन तऱ्हेचें लोंकरी काम करणें, घरामध्यें शोभेसाठीं नानाप्रकारचें चित्र विचित्र कापडी सामान तयार करणें इत्यादि गोष्टींचाही त्या कलेंत स्त्रियांना चांगला अभ्यास असला पाहिजे. तसेंच त्यांची आजकालची चित्रकला ह्मटली ह्मणजे फक्त चैत्रांगणें किंवा भिंतीवर सटवाया स्वस्तिकें वगैरे रेखाटणें एवढ्यापुरतीच आहे. ती त्याहून जास्त वाढून त्यांच्या कुशल रंगवल्लींनीं व चित्रलेखांनीं देवगृहें, ओटी, आंगण, दिवाणखाना वगैरे स्थानें शोभिवंत झालीं पाहिजेत. अनेक चालींवर ओंव्या, त्याचप्रमाणें देवादिकांचीं सुरेख गाणीं आमच्या स्त्रिया सुस्वर ह्मणत असतात. त्यापेक्षां त्यांना जास्त गायनकला पाहिजे आहे असें ह्मणण्यास आह्मी तयार नाहीं. फक्त विशेष ऐपतदार स्त्रियांनीं सतार, पेटी वगैरे कित्येक मंजुल वाद्यें वाजविण्याचें ज्ञान संपादन करून घेतलें तर तें त्यांना भूषणावह व त्यांच्या कुटुंबांतील माणसांना विशेष रंजनावह होण्याचा संभव आहे. नृत्यकला हाही एक केवळ स्त्रियांच्या ठायींच शोभणारा गुण आहे. परंतु आमच्या कुलीन स्त्रियांना तो खाजगी रीतीनें तरी कितपत उपयोगी पडेल याची आह्मास शंका आहे. नृत्यकलेनें शरीराचा बांधा वळणशुद्ध होतो व अंगांत दृढता राहून चपळपणा येतो हें एक आहे खरें; पण हे

सर्व गुण फुगडी झिमा वगैरे आमच्या कित्येक घरगुती धांगडधिंग्याच्या खेळांनींही मुलींच्या आंगीं येण्यास हरकत आहे असें आह्मास वाटत नाहीं. त्यांतच पाहिजे तर कोणी ललितकलाकुशल पुरुषांनीं उपयुक्त सुधारणा करावी.

नृत्य—गायन—वादन ह्या फक्त मनोरंजनाच्या श्रीमंती कला आहेत. ह्या जरी एकीकडे ठेवल्या तरी वरतीं सांगितल्यापैकीं, बाकीच्या दोन—ह्मणजे शिवणकला आणि चित्रकला—ह्या संसारी दृष्टीनें पाहिलें असतां ही केवळ करमणुकेच्याच नव्हत तर प्रपंचाचे उपयोगीही आहेत हें सांगावयास नको. तेव्हां ह्या दोन कला तरी स्त्रियांना खरोखरच अवगत पाहिजेत. ज्या कुटुंबांतल्या स्त्रियांची ह्या दोन कलांत बरीच कांहींशी गति आहे, तें कुटुंब किती जरी गरीब स्थितींत असलें तरी तेथली गृहशोभा कांहीं आणीक आढळेल यांत शंका नाहीं. मुलांमाणसांच्या आंगाखांद्यावर कपडेलत्ते कसे ठाकठीक आढळतील, घरांत बहुधां चहूंकडे सोईचे व दर्शनप्रिय असे पदार्थ व्यवस्थित-पणें घरातून तयार करून ठेवलेले दिसतील आणि फुर-सुतीचा वेळ आनंदानें उपयुक्त करमणुकींत खर्च होत अस-लेला पाहण्यांत येईल. ज्या घरांत गरीबी आहे तेथें शोभेचें तर काय, पण अत्यंत जरूरीचेही पदार्थ दुर्मिळ असतात; परंतु वरच्या स्त्रिया जर ललितकलांपैकीं हा थोडाच कुशलतेचा भाग उचलतील तर कोणत्याही कुटुंबांत तसल्या पदार्थांची वाण नाहींशी होऊन आपल्या असल्या स्थितींतच तें अल्पस्वल्प सुखसोयीला तरी अंतरणार नाहीं.

याप्रमाणें स्त्रियांचीं भूषणें आम्ही सांगितलीं आहेत. हीं नीटपणें विचारांत घेऊन स्त्रिया जर आपल्या आंगावर वागवतील, तर तेणेंकरून त्या स्वतः तर शोभतीलच, पण त्यांच्या योगानें आमच्या गृहाला व समाजालाही उत्तमप्रकारची शोभा येणार आहे.

प्रकरण तिसरें समाप्त.

---

# स्त्रियांचें दूषण.

## ( प्रकरण चवथें. )

---:०:---

दृशा किंचित् किंचित् चलित भुजलीला विलसितैः ॥
करा घातैः किंचिन्नखविलिखितैः किंचिदधिकम् ॥
स्पृशंत्यः संबाधे गुरुभिरनभिप्रेक्षित पथे ॥
यथेष्टं चेष्टंते स्फुटकुचतटाः पश्यकुलटाः ॥ १ ॥ *

—सुभाषित.—

मनुष्याच्या आचरणांत कित्येक वागण्याचे प्रकार असे असतात कीं, त्याजपासून पाहिलें असतां प्रत्यक्षतः कोण-त्याही प्रकारचें पाप किंवा नुकसान होत नाहीं. पण तसल्या प्रकारच्या वागण्याची सैवय झाल्यानें बरेच ठि-काणीं त्यांजपासून परिणाम कांहीं चांगला झाला अस-

---

* " ज्या स्त्रिया व्यभिचारिणी असतात त्या पुढील प्रकारच्या अंगविक्षेपांनीं आपले हेतु प्रियपुरुषास कळवितात. नेत्र चमका-वणें, हातवारे करणें, नखांनीं रेघा काढणें, वडील माणसांची दृष्टि चुकवून चोरून पाहणें व स्तन व्यक्त करणें. "

त्याचे दाखले आढळत नाहींत. तेव्हां अशा प्रकारचे पुष्कळ अनुभव घेऊन शहाण्या माणसांनीं त्याप्रकारचें वागणें मुळींच निंद्य ठरवून टाकून कुलीन व संभावित जनांच्या आचरणांत त्यांस मुळींच थारा दिला नाहीं. असल्या अत्यंत दूषित मानलेल्या वागण्याच्या प्रकारांपैकीं आमच्या स्त्रियांच्या कुलीनतेस जेवढे बाधक प्रकार ठरविले आहेत त्यांजविषयीं विचार करूं.

कुलीन स्त्रियांनीं आपल्या आचरणांतून सर्वथैव वर्ज्य करण्यासारख्या कित्येक गोष्टी प्रसिद्ध महाराष्ट्र कवी, मुक्तेश्वर, यांणीं एकेठिकाणीं येणेंप्रमाणें वर्णन केल्या आहेत.

स्वयें नर्तन गायन ॥ गीतनृत्य अवलोकन ॥
शृंगार कामशास्त्र श्रवण ॥ हें कुलक्षण कुलवंते ॥१॥
परघर अटन परघर वस्ती ॥ जार जारिणींची संगति ॥
एकटशय्या एकट पंथीं ॥ हें कुलक्षण कुलवंते ॥२॥
क्षणक्षण चंचलपणें ॥ चिरिया निरिया सांवरणें ॥
कच्छ फेडणें घालणें ॥ हें कुलक्षण कुलवंते ॥ ३ ॥
हृदय दावूनि घाली पदर ॥ पुरुष देखूनि वाढवी हार ॥
परकीयासीं एकांत विचार ॥ हें कुलक्षण कुलवंते ॥४॥
बहू हांसणें बहू बोलणें ॥ सदां हांसत गोष्टी करणें ॥
परत परतोनि निरखणें ॥ हें कुलक्षण कुलवंते ॥ ५ ॥

या लहानशा उताऱ्यांत स्त्रियांच्या कुलीनपणास न शोभणाऱ्या अशा बहुतेक गोष्टींचा थोडक्यांत पण सुरेख उल्लेख आला आहे. यांतील प्रत्येक गोष्टीविषयीं

स्त्रियांनीं अवश्य स्मरण ठेवून त्या सहसा आपल्या आचरणांत न येऊं देण्याविषयीं फार सावधगिरी ठेवावी.

कुलीन स्त्रियांस वर्ज्य ह्मणून सांगितलेल्या गोष्टींमध्यें आम्हीं स्त्रियांचें जें भूषण सांगितलें आहे त्यांत एकाप्रकाराचा निषेध केला आहे. त्याचप्रमाणें स्त्रियांच्या ठायीं कित्येक स्वाभाविक असणारे, व एकतऱ्हेनें पाहतां विशेष खुलणारेही, असे कांहीं * अभिनयसुद्धां यांत परम दूषित मानले आहेत. परंतु या विरोधा संबंधानें आमची आपली अल्प समजूत अशी आहे कीं, ( मागचे प्रकरणांत शेवटीं सांगितलेलीं ) असलीं जीं स्त्रियांचीं भूषणें आहेत तीं त्यांजकडून सर्वांच्याच नेत्रसुखास निःशंकपणें कारणीभूत केलीं जाऊं नयेत. तशीं तीं केलीं गेल्यास स्त्रियांच्या कुलीनतेस बाधा झाल्याचे अनुभव-निदान संभव तरी- जास्त आहेत. शिवाय ' व्यभिचारिणी ' या महद्दोषांत स्त्रियांना नेऊन पाडविणारीं जीं कांहीं लक्षणें ग्रंथांतरीं आढळतात, त्यांतच हीं भूषणें निःशंकपणें मिरवणें हेंही एक असल्यामुळें तर स्त्रियांनीं त्याचा स्वीकार, पाहिजेतर, केवळ आपल्याच पतीचे सुखार्थ मात्र करावा; त्यावांचून अन्य

---

* भ्रू चातुर्यांकुंचिताक्षाः कटाक्षाः ॥
स्निग्धावाचो लज्जितो श्चैव हासाः ॥
लीलामंदं प्रस्थितंच स्थितंच ॥
स्त्रीणामे तद्भूषणंचायुधंच ॥ १ ॥

अर्थ-चपल नेत्रकटाक्ष, मधुरभाषण, सलज्ज हास्य, मंद गमन वगैरे हीं स्त्रियांचीं स्वाभाविक मनोहर भूषणें तशींच आयुधेंही होत.

कोणत्याच कारणानें करूं नये असें आम्हास वाटतें. ' व्यभिचारिणी' स्त्रियांचीं लक्षणें एके ठिकाणीं आमच्या पाहण्यांत आलीं आहेत तीं येणेंप्रमाणें—

जिची तालु आणि रसना ॥ कृष्णवर्ण असे जाणा ॥
पादांगुळें न लागती भूमिस्थाना ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ १ ॥
निःशंक करी सुस्वर गायन ॥ लटिकाचि खाजवीतसे कर्ण ॥
तैसेंचि करि कंडूयन ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ २ ॥
परपुरुष देखूनि हास्यवदन ॥ तयापुढें करी बाळाचें चुंबन ॥
परत परतोनी पाहे वदन ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ३ ॥
धांवत खेळत करी गमन ॥ पुरुष दर्शनें लाजे मिथ्या जाण ॥
आवडे कंचुकी नीलवर्ण ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ४ ॥
कार्य नसतां परगृहास जाणें ॥ कामें पुरुषा अवलोकणें ॥
हंसत हंसत करी भाषणें ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ५ ॥
नृत्य गायन कामशास्त्र कथा ॥ या वांचून नावडे सर्वथा ॥
पति देखतां क्रोध येचित्ता ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ६ ॥

आह्मी प्रारंभींच सांगितलें आहे कीं, या निंद्य ठरविलेल्या वागण्याचे प्रकारांत मूळचेंच असें कांहीं नाहीं, कीं आंगीं असल्यानें ते मनुष्यास प्रत्यक्षतः कांहीं दुष्ट करूं शकतील; परंतु दूषित मार्गावर मनुष्याला अचुक नेऊन सोडणाऱ्या त्या निसरड्या वाटा आहेत एवढें मात्र लक्षांत ठेवून त्यांजविषयीं नेहमीं सावधगिरीच ठेविली पाहिजे. सावधगिरी ह्मणजे इतकीच कीं, होतां होईल तों त्या गोष्टी वर्ज्यच केलेल्या असाव्यात हें बरें; आणि

यद्यपि त्यांतील कांहीं गोष्टींचा स्वीकार करूं वाटलेंच तर केवळ 'स्वपतिसुखार्थ' एवढी तरी त्यांत मर्यादा असलीच पाहिजे, हें उत्तम. स्त्रियांच्या कुलीनतादर्शक वर्तणुकेविषयीं आमच्या देशाचा जो सर्वत्र लौकिक आहे तो केवळ, त्यांच्या जातीस जेवढीं ह्मणून भूषणें मानलीं आहेत तेवढ्यांचाच पूर्णपणें स्वीकार; आणि दूषणांचा सर्वथैव त्याग करण्याविषयीं त्यांचें आज बहुकालचें व्रत त्यांनीं आपल्या ठायीं दृढतर बाळगून ठेवलें आहे त्यामुळेंच होय. या व्रताचरणाविषयीं त्यांनीं आपली ही स्वाभाविक असलेली तत्परता अशीच ह्या पुढेंही कायम ठेवल्यास आमच्या देशाच्या आधुनिक हतभाग्य स्थितींतही त्या कीर्तिप्रद होतीलच; पण सामाजिक व धार्मिक गोष्टींत नुकतेंच मनुष्यपणांत येऊं घातलेल्या इतर कित्येक राष्ट्रांच्या स्त्रियांनाही त्या अनुकरणीय होतील यांत तिलप्राय शंका नाहीं.

प्रकरण चवथें समाप्त.

---

# स्त्रियांच्या आवडत्या गोष्टी.

## ( प्रकरण पांचवें. )

———:०:———

स्वाभाविकपणें ह्मणा किंवा अति अज्ञानानें ह्मणा, रूप, दागदागिने आणि संतति ह्या तीन गोष्टींचा एक प्रकारें विलक्षण लोभ बहुतेक स्त्री जनांच्या ठिकाणीं विशेषेंकरून आढळून येत असतो. हा लोभ सर्वथा नाहींसाच झाला पाहिजे असें कांहीं आह्मी या ठिकाणीं सांगत नाहीं.

तिन्ही गोष्टी इष्ट आहेत, चांगल्या आहेत. तेव्हां त्यांचा तिरस्कार संसारी दृष्टीनें विचार करणारास तरी अयोग्यच म्हटला पाहिजे. मात्र अतिशयपणानें त्याविषयींच्या लोभाचें जें एक फाजील स्वरूप होऊन बसलें असतें ते कांहीं दोन विचाराच्या गोष्टी सांगून वेतावर आणून ठेवलेलें असावें हें बरें; असें वाटल्यावरून त्यां संबधानें थोडा विचार करूं.

रूप—सरळ नासिका, विशाल नयन, कुटिल केश, विस्तीर्ण भाळ, गौर वर्ण, पुष्ट जानु, उन्नत वक्षस्थळ, सूक्ष्म-कटिप्रदेश, आरक्त अधरबिंब, उत्तुंग जघन इत्यादि लक्ष-णांनीं युक्त जी स्त्रीजनांची सुरूपसंपन्नता ती कोणाला प्रिय वाटणार नाहीं बरें ? खरोखर ती सर्वांसच प्रिय वाटेल. आणि प्रिय वाटेल इतकेंच नव्हे, तर ती आपल्याही ठिकाणीं असावी अशी प्रत्येक स्त्रीचे अंत:करणांत स्पृहा देखील उत्पन्न होईल. तसेंच खबुजें तोंड, पिचके—बटबटीत—किंवा खोल गेलेले डोळे, बसकें- अग्रे—किंवा उर्ध्वमुख असें नाक, पुढें आलेले दांत, कृष्णवर्ण इत्यादि लक्षणांनीं युक्त जी कुरूपता तीही कोणाला तिरस्करणीय अशी वा-टणार नाहीं बरें? खरोखर तिचा सर्व जण तिरस्कारच करतील, इतकेंच केवळ नव्हे, तर ती ज्यांच्या आंगीं असेल त्यांना ती लौकिकांत घेऊन नाइलाजास्तव मि-रवतांना सुद्धां अत्यंत लज्जा वाटत असेल ! पण याप्रमा-णें सुस्वरूपपणाची स्पृहा व कुरूपपणाची लज्जा मनांत बाळगिण्यापूर्वीं आम्ही या ठिकाणीं दोन गोष्टी सांगतों त्यांचा सर्वांनीं विचार करावा असें आमचें त्यांस वि-नयपूर्वक सूचविणें आहे.

नाकें नीट करण्याचीं, किंवा शरीराचा सर्वच बांधा बळणशुद्ध करण्याचीं साधनें अमेरिकेंत* निघालीं आहेत असें ह्मणतात. हीं साधनें सोयीचीं ठरून सर्वत्र प्रचारांत येतील तेव्हां येवोत पण; तों पावेतों तरी सुरूपता किंवा, कुरूपता ही गोष्ट कोणाच्याही हातची आहे असें कांहीं ह्मणतां येणार नाहीं. केवळ नैसर्गिक ही गोष्ट आहे असेंच ह्मटलें पाहिजे. त्यावांचून तूर्त निर्वाह नाहीं. तेव्हां जी गोष्ट आपल्या किंवा दुसऱ्या कोणाच्याच हातीं नाहीं, ती किती जरी इष्ट असली तरी तिच्या लाभालाभाविषयीं जी कांहीं स्पृहा किंवा लज्जा आपण आपल्याठिकाणी बाळगावयाची आहे तिला बरीचशी मर्यादा पाहिजे हें यावरून उघड होत आहे. इतकें मात्र खरें कीं, अशाही गोष्टींत आपल्या स्वाधीनचा ह्मणून जो कांहीं भाग असतो, तेवढ्याविषयीं हयगय किंवा दुर्लक्ष न होऊं देण्याविषयीं जपावें हें आपलें काम आहे. तेवढें आपण अवश्य बजावलें ह्मणजे झालें. आतां रूपसंपन्नतेच्या बाबतींत हें काम ब-

* "रूपवत्त्व हें आजपर्यंत नैसर्गिक देणें आहे ह्मणून लोकांत मानतात; परंतु आतां लौकरच तेंही कदाचित् यंत्रसाध्य होईल कीं काय असें वाटतें, अमेरिकेंत नकटें किंवा अग्रें नाक नीट करण्याचें यंत्र निघालें आहे असें मागेंच आह्मी 'साएंटिफिक अमेरिकन' नांवाचें वर्तमानपत्रांत पाहिलें होतें. हल्लीं तर असें ऐकण्यांत येत आहे कीं, नुसत्या नाकाचा नकटेपणा तर काय पण इतरही बहुतेक सर्व अवयवांची कुरूपता नष्ट करून एका सहा महिन्यांत रूपसंपन्न मनुष्य बनविण्याचा एका डाक्तरीण स्त्रीनें विद्या संपादन केली आहे. हल्लीं अमेरिकेंत तिजकडे बऱ्याच स्त्रिया येतात व ती सांगते तशा पथ्यानें राहून त्या सुस्वरूप होऊन जातात असें कळतें ! वाहवारे कल्पना".

आवयाचें ह्मटलें ह्मणजे इतकेंच कीं, शरीराच्या आकारानें आपण कोणत्याही स्थितींत असलों तरी आपल्या लेण्या-सवरण्यांत, उठण्याबसण्यांत, आणि शरीरसंबधीं व्यवस्थेंत, अनुक्रमें भोंगळसुतेपणा, विचित्रप्रकारचे आंगविक्षेप व अमंगलता बिलकुल न ठेवतां, चापचोपी, ऐट व स्वच्छपणा हीं योग्य प्रकारें आणि जेथल्या तेथे राखलीं पाहिजेत. तेवढीं तीं राखलीं असतां ज्यांच्या आंगीं स्वयंभू रूपवत्व आहे त्यांना त्यांपासून विशेष शोभा येईल व जे स्वयंभू रूपविहीन असतील त्यांच्यांतलें व्यंग बऱ्याच अंशांनीं नजरेस कमी येऊन ते तिरस्करणीय असे तरी खचित वाटणार नाहींत.

"कुरूपता शीलतया विराजते"

हें एक सुभाषित वचन आहे. तेंही या ठिकाणीं ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. शीलसंपन्नता–अर्थात चांगलीं गुणकर्मे–आंगीं असलीं ह्मणजे त्यां खालीं शरीराचा कुरूपपणा शोभून जातो. शीलाविषयीं मागें एका प्रकरणांत सविस्तर विचार केला आहेच. त्यावरून त्याचा प्रभाव लक्ष्यांत आणला ह्मणजे त्या प्रभावानें, तिरस्करणीय वाटणारें जें शरीर व्यंग तें कसें लोपून जाईल याची आतां कोणास शंका राहणार नाहीं.

रूपवत्वाविषयी आणखी असें एक लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, अमुक एक प्रकारें शरीराचा आकार असला ह्मणजे त्यास रूपवान ह्मणावें हा नियम ह्मटला ह्मणजे केवळ आवडीवर किंवा रुचीवर अवलंबून असतो. आतां

ही आवड निरनिराळ्या देशांत* तर निरनिराळ्या प्रकारची असतेच; पण फार तर काय, एकाच देशांतील निरनिराळ्या जातींत व व्यक्तींत सुद्धां निरनिराळीच असते. तेव्हां, घटकाभर फारच थोड्या व्यक्तींत आढळणारी अगदींच ओंगळ विद्रूपता एकीकडे ठेवून बाकी सर्वत्र शरीराकारांत सुरूप आणि कुरूप हीं नांवें कोणी कोणास दिलेलीं खरीं मानावींत हें अनिश्चितच म्हटलें पाहिजे. या करितां अशाही विचारानें पाहतां स्वायत्त नव्हे अशी जी ही स्वरूप स्थीति तिला फारसें महत्त्व न देतां ती कोणत्याही आकारमानाची असली तरी, तिला दर्शन, स्पर्शन–प्रिय करविण्याच्या ज्या तीन गोष्टी–चापचोपी, ऐट व स्वच्छता–वरल्या परिच्छेदांत दर्शविल्या आहेत त्यांच्या संबंधानें कायती आमच्या स्त्रीजनांनीं वाटेल तितकी स्पृहा धरावी, व त्यांच्याच उलट ज्या तीन गोष्टी सांगितल्या आहेत–म्हणजे भोंगळसुतेपणा, विचित्र आंगविक्षेप, व अमंगलता–ह्या एखाद्या मूळच्याच सुस्वरूप युवतीच्या

---

*रूपवत्त्वाची कल्पना निरनिराळ्या देशांत किती निरनिराळ्या प्रकारची असते तें पहा-तर्तरीत नाक असणें हें एका देशांत सुस्वरूपपणाचें लक्षण मानतात, तर दुसऱ्या एका देशांत नाकाचा चापटपणाच प्रशस्थ मानतात. सरळ, लांब, कुटिल असा केशकलाप एका देशांत प्रिय तर दुसऱ्या देशांत तो मुळींच काढून टाकणें हें प्रिय, मानतात; गौरवर्णाविषयीं तर आफ्रिकेंतल्या 'कोळशातल्या माणकांची' (सिद्दी लोकांच्या स्त्रियांची) अशी समजुत आहे कीं, आपला जो उत्कृष्ट कृष्णवर्ण, हाच पूर्वी जगांतल्या सर्व लोकांचा होता. पण यूरोपिअन लोकांवर कांहीं ईश्वरी अवकृपा झाल्यानें त्यांचा तो सुरेख कृष्णवर्ण नष्ट होऊन ते बिचारे पांढरे फटफटीत पडले!

झार्यीं असल्या तरी तिला त्यांजबद्दल लज्जाच उत्पन्न व्हावी असें आमचें सांगणें आहे. रूपवत्त्वासंबंधानें स्त्रीजनांमध्यें एवढी स्पृहा व इतकी लज्जा असली म्हणजे पुरें आहे. मग त्या आपल्या शरीराकारानें कोणत्याही स्थितींत असल्या तरी त्यांना आपली ही एक अत्यंत आवडती गोष्ट आपल्या जवळच नेहमीं असल्याचा आनंद उपभोगावयास सांपडेल अशी आह्मास पूर्ण खात्री आहे.

डागदागिने, ही स्त्रियांची दुसरी आवडती गोष्ट होय. डागदागिन्यांची हौस नाहीं अशी स्त्री फारच विरळा आढळेल. डागदागिने हें सुंदरता जास्त आणण्याचें एक साधन आहे; आणि कित्येक दागिने खरोखरच असे आहेत कीं ते स्त्रियांचे रूपास जास्त मनोहारकता आणतात. परंतु ही दागिन्यांची हौस वाढतां वाढतां इतकी वाढली आहे कीं कांहीं तरी आकाराचा अलंकार करून आंगावर घालावा व कोणीकडून तरी आपलें शरीर नखशिखान्त सोन्यानें मढवून काढावें. मग तसें करतांना दागिने घालण्याचा जो एक हेतु–शरीर शोभा–हा न साधून उलटी शरीरास विरूपता आली तरी कांहीं हरकत नाहीं. ह्या विलक्षण हौसेच्या योगानें कित्येक स्त्रिया आपलीं शरीरें विशोभित करून ठेवतात इतकेंच नव्हे; तर त्यांसाठीं तीं अतिशय छिन्नविच्छिन्न करून शारीरिक इजाही सोसण्यास त्या तयार होतात. असल्या एका सोशिक स्त्रियेची हरदास बोवा कथेमध्यें एक गोष्ट सांगत असतात. ती अशी कीं, नवऱ्यानें अतोनात दागिने घातले तरी एका स्त्रियेची हौस पुरी होईना. आणखीही दागिने घा-

लण्यास मिळतील तर बरें असें तिला वाटे. तेव्हां मग त्यानें चारपांच शेर वजनाचा एक दगडी वरवंटा सोन्याचे पत्र्यानें मढवून तो तिच्या गळ्यांत आडकावून दिला. त्यावेळेस त्या स्त्रीचें कांहीं समाधान झालें ! तो वरवंटा ती सोसाळमावशी गळ्यांत आडकावून जेव्हां इकडून तिकडे घरभर मिरवे; तेव्हां तो तिच्या उरस्थळावर आपटून तिचा ऊर खूप सुजला परंतु ती कांहीं क्षणभर सुद्धां त्यास विसंबली नाहीं ! ही एक हरदासी नक्कल ह्मणून कोणास खोटी वाटेल, पण काप , बाळ्या, बुगड्या, कुडीं, भोंकरे, कुडूक वगैरे एकेक लचांडें आडकविण्यासाठीं आमच्या स्त्रिया आपल्या कानाचें कसें धिरडें करून ठेवतात हें बहुधां कोठेंही आढळण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें ह्या दागिन्यांच्या विशेष सोसामुळें दागिने घालून केवळ शरीरास शोभा आणावयाची असते ही एक गोष्ट तर स्त्रिया अगदींच विसरून गेल्या आहेत. त्यामुळें शरीरास खरोखर मनोहारकता आणणारे दागिने किती व कोणते हा विचार एकीकडेच राहून, नाहीं नाहीं ते विलक्षण प्रकार दागिन्यांत शिरले आहेत. त्यांपैकीं एक विशेष मौजेचा मासला म्हटला ह्मणजे केसांत गुंफण्याकरितां केलेल्या सोन्याच्या उवा ह्या होत ! किंवा लहान मुलाच्या कटिसूत्रांत सोन्याच्या घागऱ्यांमध्यें पुरुषाच्या जननेंद्रियाच्या आकाराचा एक अलंकार करून आडकवितात तो होय !!

दागिने करण्यांत दोन उद्देश उघड दिसत असतात—एक शोभा, आणि दुसरा साहजिक द्रव्यसंग्रह—ह्या दो-

न्ही उद्देशांविषयीं विचार करून पाहतां; पहिल्या उद्देशा-बद्दल वरल्या परिच्छेदांत सांगितलें आहे त्याहून आ-णखी जास्त इतकेंच सांगतां येईल कीं, केवळ शोभेसा-ठीं दागिने ह्मटले ह्मणजे फारच थोडे ( ते मात्र चांगले ठळकसे ) असले ह्मणजे पुरे आहे. त्या थोड्यांची निवड ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें व्हावी लागते या करितां आ ह्मांस येथें त्यांचीं नावें सांगतां येणार नाहींत. आतां साहजि-क द्रव्यसंचयाचा जो दुसरा उद्देश आहे त्याबद्दल असें सांगावयाचें कीं, आजच्या प्रसंगीं कालदेशवर्तमानस्थिति लक्षांत आणतां दागिन्या पेक्षां जास्त फायदेवाईक, उप-योगी, व सुरक्षित अशा, द्रव्यसंचय होण्यासारख्या इतर पुष्कळ गोष्टी उपलब्ध आणि अवश्यक असल्यामुळें हा दुसरा उद्देश केवळ दागदागिन्यांच्या द्वारेंच साधून घे-ण्यांत कांहीं विशेष अर्थ आहे असें नाहीं. उलटा अनर्थ मात्र ह्या प्रकारच्या द्रव्यसंचयापासून ओढवल्याचे दाखले पुष्कळ ऐकूं येतात. दागिन्यांच्यापायीं मुलेंबाळें धोक्यांत पडलेलीं उदाहरणें तर-हरहमेष घडत आहेत. तेव्हां अशारीतीनें द्रव्यसंचयाचा उद्देश साधूं जाणें हें अगदींच व्यर्थ आहे. श्रमकरून द्रव्य गांठतां गांठतां एखादा दागि-ना तयार करावा आणि एकदम तो हरवला किंवा चो-रापोरीं गेला ह्मणजे प्राणावरही बेतण्याचा प्रसंग यावा हें चांगलें नाहीं.

आतां दागिने घालण्यांत निव्वळ शोभेचाच उद्देश धरून खोटे दागिने वापरावेत अशी एक सूचना अलीकडे पुष्कळ विद्वानांकडून पुढें येत असते. त्यांचें ह्मणणें असें

आहे कीं, शोभेच्याच दृष्टीनें पाहिलें असतां खऱ्यापेक्षां खोट्या दागिन्यांनींच ती विशेष साधणार आहे. असले खोटे दागिने हरवल्याची आपणास खंति वाटणार नाहीं त्याचप्रमाणें ते आपणाजवळून कोणी मारून मुटकून घेऊन जातील ही भीतिही आपणास राहणार नाहीं. ह्याशिवाय खरे दागिने आंगावर वरचेवर वापरण्यानें झिजून द्रव्यदृष्टीनें जें आपलें नुकसान व्हावयाचें त्याजबद्दल क्षितिही या खोट्या दागिन्यांविषयीं बाळगण्याचें कारण नाहीं. हें ह्मणणें समूळ सोडून टाकण्या जोगा जरी याजबद्दल आह्मी पूर्णरीतीनें स्वतंत्र विचार केला नाहीं तरी हें ग्राह्य करावें अशा रीतीचा कांहीं आमच्या मनावर अद्यापि परिणाम झाला नाहीं. आमच्या आपल्या अल्पसमजुतीला ही खोट्या दागिन्यांची सूचना अजून अग्राह्यच वाटते. व त्याजबद्दल आमचें एक छोटेंसेंच कारण आहे तें आह्मी एथें सांगून ठेवतों. तें कारण व दागिन्यासंबंधानें ह्या भागांत आह्मी यथामति केलेलें एकंदर प्रतिपादन लक्ष्यांत घेतां ही खोट्या दागिन्यांची सूचना तितकी कांहीं अवश्यक नाहीं असेंच वाचकांना वाटेल अशी आह्मास खातरी आहे.

आंगावर खोटे दागिने घालून शरीर आलंकृत करणें हा वास्तविक पाहतां अडाणी किंवा रानटी स्थितींतला एक शोभेचा प्रकार आहे. जसजशी सुधारलेली स्थिति येत जाईल तसतसा हा प्रकार कमीच होत गेलेला पाहण्यांत येतो. अडाणी किंवा रानटी स्थितींत बालिशता आंगीं असते, व सुधारलेल्या स्थितींत वर्तनविषा-

रीत पोक्तपणा येतो. पोक्तपणाच्या दृष्टीनें ह्मटलें ह्मणजे खोटे तर काय पण खरे सुद्धां दागिने आंगावर खूप घालून शरीर भूषित करावें हें उचित मानलेलें नाहीं. त्या दृष्टीनें पाहणारांचे भूषणालंकार वेगळेच आहेत. एका संस्कृत सुभाषितांत तसल्या प्रकारच्या आलंकारांचें थोडेंसें दिग्दर्शन आढळतें तें असें:—

*श्रोत्रं श्रुते नैव न कुंडलेन ॥
दानेन पाणि र्नतु कंकणेन ॥
विभाति कायः करुणापराणां ॥
परोपकारैर्नतु चंदनेन ॥ १ ॥

या श्लोकांत शरीराचीं वास्तविक भूषणें सांगितलीं आहेत. आणि विचारपूर्ण दृष्टीला तींच योग्य आहेत. मनुष्यास शोभा आणणारे उत्कृष्ट आलंकार सद्गुणांशिवाय दुसरे कोणते आहेत ? आणि ज्यास हे आलंकार साध्य आहेत त्याजपुढें इतर कृत्रिम आलंकारांची थोरवी किती असणार+ ? याकरितां आह्मी आपल्या ( विशेषतः स्त्री ) वाचकांना सांगतों कीं, आपलें शरीर सुशोभितपणें लौकिकांत मिरवण्याची त्यांची हौस उत्तमप्रकारें त्यांना पूर्ण करून घ्यावयाची असेल तर त्यांनीं हे सद्गुणालंकार प्रथमतः प्रयत्नेंकरून आपल्या आंगीं धारण करावेत.

* “ कर्ण हे सच्छास्त्रश्रवणानेंच शोभतात; कुंडलांनीं नाहीं, हात दानानें शोभतो, कंकणानें नाहीं. आणि जे दयाशील आहेत त्यांचा देह परोपकारांनी शोभतो, चंदनानें शोभत नाहीं.”

+श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं सत्यं कंठस्य भूषणं ॥
हस्तस्य भूषणं दानं भूषणं किं प्रयोजनं ॥ १ ॥

ज्यांना हे योग्य आलंकार दुष्प्राप्य झालेले असतात, तीं- च मनुष्यें खऱ्या किंवा खोट्या दागिन्यांनीं आपल्या श- रीरास शोभा आणीत असतात. पण ती किती झाली तरी कृत्रिमच शोभा समजली पाहिजे. तसल्या शोभेनें मनुष्याची वास्तविक योग्यता कांहीं वाढत नाहीं. सुवर्ण रत्नादिकांनीं खरमर्कटादि जनावरांचीं शरीरें सुद्धां पाहिजे तशीं आलंकृत करून ठेवतां येतात, परंतु सद्गुण रत्ना- लंकृत होणें हा एक विशेष अधिकार परमेश्वराचे कृपेनें मनुष्यासच मिळाला असल्यामुळें तो आपला आपण अगोदर उपभोगण्याविषयीं तत्पर असावें हेंच योग्य आहे. तेव्हां आपण ज्या समाजांत वागत असूं त्या समाजास भूषणभूत होण्याकरितां सद्गुणांनींच आपलें शरीर आलं- कृत करावें, ही उत्तम गोष्ट आहे व प्रथमतः तीच सा- धण्याची सर्वांना वास्तविक हौस असली पाहिजे.

संतति ही स्त्रियांच्या विशेष लोभांपैकीं तिसरी गोष्ट आहे. ही प्राप्त करून घेण्याच्या नादांत स्त्रिया नाहीं नाहीं त्या साहसाच्या व अत्यंत देवभोळेपणाच्या खटप- टींत पडलेल्या आढळतात. संततीसाठीं दुसऱ्याच्या शि- कवणीनें स्त्रियांनीं पुष्कळ साहस केलेल्या कांहीं गोष्टी एखादेवेळीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या दृष्टीस पडत असतात. एकदां आमच्या वाचण्यांत असें आलें होतें कीं, कोणा स्त्रीनें आपल्या शेजारणीच्या तान्ह्या मुलाचें इंद्रिय कापून साखरेबरोबर खाल्लें ! तसें केलें असतां तुला मूल होईल असें त्या मूर्ख स्त्रीस कोणीं सांगितलें होतें. दुसऱ्या एका स्त्रीनें तर पुत्रलाभाकरितां आपल्या पतीस कोणाच्या

सांगण्यावरून पाल मारून पदार्थांत शिजवून खावयास घातली होती! भोजनसमयीं ती गोष्ट त्याच्या समज-ण्यांत लौकर आली ह्मणून खैर झाली; नाहींतर पुत्र मिळ-विण्याच्या खटपटींत बिचारीवर नोवराच गमाविल्याचा मात्र प्रसंग येता! संततीसाठीं लटकाच गर्भारपणाचा आव घालून दरमहा एकेक याप्रमाणें नऊ महिने पोटावर घड्या बांधाव्यात आणि कोणातरी ताज्या बाळंतिणीचें मूल चोरून आणून किंवा विकत घेऊन आपलें खोटें बा-ळंतपण साजरें करावें असेही मासले केव्हां केव्हां ऐकू येत नाहींत असें नाहीं. संततीच्या विलक्षण हौसेचा ह्या-पेक्षाही एक घाणेरडा परिणाम होत असतो, तो तर फा-रच वाईट! चांगल्या कुलीन स्त्रियांनादेखील सन्मार्गा-पासून भ्रष्ट करण्यास संतती व दागदागिने या दोन गोष्टींवरील त्यांची विशेष आवड, ठक व भोंदू लोकांना जशी उपयोगी पडते तशी दुसरी कोणतीच उपयोगी पडत नाहीं. संतती देण्याच्या मिषानें आजपर्यंत लुच्चे लोकांनीं अनेक स्त्रिया नाडल्याचे बोभाटे पुष्कळांच्या कानीं आले आहेत, तरी सुद्धां कित्येकांचे डोळे उघडत नाहींत. या बाबतींत स्त्रियांना विशेष बोल काय लावाव-याचा आहे ह्मणा–कारण त्या बोलून चालून अज्ञान व अप्रबुद्ध स्थितींत आहेत-पण चांगल्या मणगटासार-ख्या पीळदार मिशा ओंठावर बाळगणारे पुरुषदेखील सोद्यालुच्च्यांच्या नादीं लागून आपल्या स्त्रियांना त्यांजक-रवीं संततीचा लाभ करून घेण्यास परवानगी देतात तेव्हां हें किती विलक्षण बरें! " नवसें कन्या पुत्र

होती ॥ तरि कां करणें लागे पती" ह्या तुकाराम महाराजांच्या वचनाचा विचार अशीं नादी मनुष्यें अवश्य करतील व आमच्या एका मित्रानें आह्मास सांगितलेला एक चुटका आह्मीं पुढें दिला आहे तो वाचून तरी 'कांहीं फळांत पावतील अशी आह्मास आशा आहे.

संतती साठीं कांहीं नेमनिष्ठ बाया एका पिंपळास प्रदक्षिणा घालीत होत्या त्यांचा तो नित्यक्रम चालला असतां एकेदिवशीं एका थट्टेखोरानें आपल्या घरच्या एका कालवडीस धावळी नेसवून व कांहीं स्त्रियांचे आलंकार घालून त्या ठिकाणीं आणलें, आणि तिला हातीं धरून त्या स्त्रियांच्या मागोमाग त्या पिंपळाभोंवतीं तो तिला फिरवूं लागला. हा त्याचा फाजील प्रकार पाहून त्यांतील एका स्त्रीनें "हें काय करतोस?" ह्मणून त्यास विचारलें, तेव्हां त्या थट्टेखोरानें उत्तर दिलें कीं, "आमची ही कालवड कांहीं केल्या वित नाहीं; याकरितां तिजकडून पिंपळास एक लक्ष प्रदक्षिणेचा नवस करविला आहे. तो करून, पाहतों गुण आला तर!" हें ऐकून त्या बाया फार ओशाळल्या व आपापलीं पूजापात्रें घेऊन तडक घरीं चालत्या झाल्या!

संततीविषयीं स्त्रियांच्या ठायीं जसा विशेष लोभ असतो तशीच संततीच्या संबंधानें त्यांच्यावर केवढी जबाबदारी आहे हें त्यांना माहीत असेल तर फार बरें आहे. पुष्कळ आईबापें या जबाबदारीसंबंधानें अगदींच अज्ञ असलेलीं आढळतात. ही जबाबदारी ह्मणजे इतकीच कीं, या संततिलोभाचा परिणाम केवळ लोकसंख्येंत भर इतकाच कांहीं

होऊं नये; किंवा त्या संततीची गुजरणूक पुढें अनाथ गृहें, धर्मार्थ दवाखाने अथवा तुरुंग यांत होण्याची पाळी येऊन त्यांच्या पोषणाचें अगर उपद्रव सहन करण्याचें ओझें लोकांच्या शिरावर आदळण्याचा प्रसंग येऊं नये. संतत्युत्पादक माणसें आपल्या समाजाचीं एक प्रकारें ऋणीच होतात. व तें ऋण, त्यांना आपली संतति स्वकष्टार्जित द्रव्यानें उपजीवन करूं लागेपर्यंत योग्य प्रकारें तिचें पोषण करून व तिला उपयोगी शिक्षण देऊन, फेडावें लागतें. आपल्या आईबापांकडून हें ऋण फेडविण्याविषयीं मुलांचा देखील हक्क पोहोंचत असतो. कारण त्यांना या जगांत जें अस्तित्वांत आणलें जातें तें केवळ आईबापांनीं आपल्याच हौसेकरितां होय. आणि आपली हौस दुसऱ्याच्या त्रासास कारण झाली तर तो सदोष गुन्हा ठरत असतो. याकरितां या गुन्ह्यांत सांपडूं नये ह्मणून आपल्या संततीचें पोषण करण्याची व तिला शिक्षण देण्याची जबाबदारी बजावण्यांत आपणाकडून बिलकुल हयगय होऊं न देण्याविषयीं सावधगिरी ठेवणें हें जरूर आहे. ही जबाबदारी ह्मणजे एक विशेष कर्तव्य आमच्या स्त्रियांच्या शिरावर येत आहे हेंही या ठिकाणीं ध्यानांत ठेवलें पाहिजे.

संततिसंबंधानें आईबापांवरील जबाबदारींत पोषण व शिक्षण या ज्या दोन गोष्टी वरतीं सांगितल्या त्यांपैकीं, पोषणाविषयीं ह्या ठिकाणीं जास्त कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. नैसर्गिक प्रेमवात्सल्यानें संततीच्या पोषणाचा प्रकार आमच्या आईबापांकडून अजून यथास्थित चालत आहे. केवळ जन्मापुरता संततीचा आपला संबंध,

जन्मतांच एखाद्या अनाथबालरक्षकगृहांत त्यांची गुज-रणूक करून देऊन पुनः आपण आपले स्वैरविहार कर-ण्यास मोकळे; अशी सुधारलेल्या कित्येक देशांतली चाल अद्यापपर्यंत आमच्यांत अनुकरणद्वारें शिरूं लागली नाहीं. आमचीं आईबापें कितीहि गरीब स्थितींत असोत, वेळेस आपल्या स्वतांचे पोटास चिमटा घेतील, पण आपल्या तान्ह्या व पारड्या सर्व मुलांचें पोषण करण्यांत त्यांजकडून कधींहि हयगय व्हावयाची नाहीं. नाहीं ह्मणायला शिक्ष-णाविषयीं संततीची अत्यंत अबाळ होत असते हें मात्र खरें. संततीस शिक्षण देणें ही आपल्यावर एक मोठी जबाब-दारी आहे असें आमच्या स्त्रियांना तर काय, पण कैक पुरुषांना देखील अद्यापि वाटूं लागलें नाहीं. शिक्षण ह्मणजे लिहितां वाचतां येणें, तें शाळेंत व्हावयाचें व त्याचा उपयोग कोठें तरी नौकरी मिळावयाची या पली-कडे या जबाबदारीच्या दुसऱ्या गोष्टीची व्याख्याच को-णाला माहीत नाहीं. पण ही त्याची व्याख्या नव्हे. शिक्षण हा एक संस्कार आहे. ज्या वस्तूचा जो उपयोग व्हाव-याचा तो उपयोग तिजपासून उत्तमप्रकारें व्हावा, अशा स्थितींत तिला नेऊन ठेवण्याची जी क्रिया, त्याला संस्कार ह्मणतात. हाच संस्कार मनुष्यावर घडतो तेव्हां त्याला शिक्षण हें नांव येतें. या व्याख्येप्रमाणें पाहतां केवळ लिहितां वाचतां येणें याहून जास्त कांहीं प्रकारांचा शिक्षण या शब्दांत अंतर्भाव होतो. गृहशिक्षण हा त्यांतलाच एक प्रकार आहे व त्याची व्यवस्था आईबापांसारख्या घरच्या प्रेमळ पालकांकरवींच मूळारंभीं लागणें जरूर आहे. या-

विषयीं जास्त विचार मागें " स्त्रियांचीं कर्तव्यकर्मे " या प्रकरणांत शेवटीं केलाच आहे, तेव्हां या ठिकाणीं आतां जास्त विस्तार नको.

प्रकरण पाचवें समाप्त.

---

# स्त्रियांवरील कांहीं विशेष प्रसंग.

## (प्रकरण साहावें.)

:o:

फक्त स्त्रीवर्गासच भोगावे लागतात अशा कांहीं प्रसंगांचें आह्मी या प्रकरणांत वर्णन करणार आहों. हे प्रसंग बहुधा अपरिहार्य तर असतातच; पण त्यांपैकीं कांहींना केवळ अज्ञानजन्य गैरसमजुतीनें जें एक प्रकारें भयंकर स्वरूप आलें असतें, तें बरेच अंशानें सौम्य करून ठेवण्याचा प्रयत्न करून पाहण्याचा या ठिकाणीं यत्न आहे.

सासुरवास हा एक स्त्रियांवरील पहिला प्रसंग होय. आमच्यांतील बहुतेक सर्व स्त्रीजनांस हा प्रसंग थोडाबहुत तरी अनुभवावा लागतोच. कारण आपल्या योग्यतेप्रमाणें आपणास पति मिळेल तेव्हांच आपण लग्न करूं अथवा आदेहपात मुळीं कधीं लग्नच करावयाचें नाहीं * अशा-

---

* " मंदोदरी—सिंहलद्वीपीच्या चंद्रसेन राजापासून गुणवती भार्येच्या ठायीं झालेली एक कन्या, ( तिचें नांव. ) ही रूपानें अतिशय सुंदर असून वयांत आली असतां पित्यानें इंद्र देशीचा राजा, सुधन्वा, त्याच्या कंबुग्रीव पुत्राशीं इच्या विवाहाचा निश्चय केला. परंतु हिनें पित्यास सांगितलें कीं, बहुधां पुरुष परस्त्रियांशीं रत होऊन विवाहित स्त्रीचा त्याग कर-

प्रकारच्या प्रतिज्ञा करून राहिलेल्या स्त्रियांचीं वर्णनें जरी आमच्या पौराणिककालीं आढळतात, तरी आजकालची एकंदर रूढी ह्मटली ह्मणजे अशीच कीं, मुलीला साधारण कळूंवळूं लागल्यापासून दहा अक्रा वर्षांचे आंतच आईबापांनीं आपल्या सोयीप्रमाणें कोणाच्या तरी गळ्यांत बांधून तिला एकदां सासुरवाशीण करून ठेवावें. वास्तविक पाहतां सासुरवाशीण करून ठेवणें ह्मणजे मुलीला एखाद्या मोठ्या संकटस्थितींत किंवा भयंकर प्रसंगांत नेऊन पाडणें असें नव्हे. स्त्रीजातीच्या आत्मोन्नतीस* तर विवाह-

णारे असतात, ह्मणून मला विवाहच कर्तव्य नाहीं. त्यावरून राजानें तिला पुष्कळ बोध केला; परंतु ती ऐकत नाहीं असें जाणून तो विवाह त्यानें रहित केला."

" कांहीं काळानें हिची कनिष्ठ भगिनी, इंदुमति, हिचा विवाह होऊं लागला असतां त्या समारंभास अनेक देशींचे राजपुत्र आले. त्यांत मद्रदेशचा चारुदेष्णानामक अतिरूपवान् राजपुत्र आला होता. त्यास पाहून हिचें मन पहिल्या निश्चयापासून ढळलें. व तिनें पित्यास मला अमुकाशीं विवाह कर्तव्य आहे ह्मणून कळविलें. त्यावरून त्यास आनंद होऊन त्यानें इंदुमतीच्या विवाहसमारंभांतच हिचा विवाह केला. कालेंकरून हिनें जें पूर्वी पुरुषांविषयीं भविष्य केलें होतें तेंच हिच्या अनुभवास येऊन हिला दुःख झालें.' ( भा. प्रा. ऐ. कोश. )

* स्त्रियांना सद्गति प्राप्त होण्याला विवाहाची किती आवश्यकता आहे एतद्विषयीं एक प्रमाणभूत कथा येणेंप्रमाणें आह्मास आढळली आहे.—" कुणिगर्ग नामक कोणी एक ब्रह्मर्षि होता, त्यास एक मानसकन्या होती. ( हीच प्रसिद्ध सुलभामैत्रेयी असावी असें ह्मणतात. ) ती यौवनावस्थेत आल्यावर तिचा विवाह करावा असें यानें मनांत आणलें, परंतु तिच्या योग्य पति मिळेना, त्यामुळें ती तशीच राहिली, व तप करूं लागली.

स्थिति ही अत्यवश्यकच आहे; पण या विवाहितस्थिती-बरोबरच ' सासुरवास ' या शब्दाच्या रूढार्थानें दर्शविणारी जी त्या मुलीची ( हल्लीं प्रचारांत असलेली ) एक भावी *अवस्था मनांत येते, ती पाहिली म्हणजे मात्र ' सासुरवास ' हाही स्त्रियांवर एक प्रसंगच आहे- आणि तोही पण आजकालच्या वहिवाटीप्रमाणें अगदीं अपरिहार्य प्रसंग आहे-असें म्हणावें लागतें.

' सासुरवास ' या शब्दाचा रूढार्थ ' मुलीला सास-

---

कालांतरानें हा ऋषि देहत्याग करून स्वर्गास गेला. तेव्हां ती कन्या त्याचे आश्रमांत देव आणि ऋषि यांच्या तृप्तिपूर्वक तप करीत असतां बरीच वृद्ध झाली. एकदां तिनें मनांत आणलें कीं, आतां देहत्याग करून उत्तम लोकास जावें. तों तेथें अकस्मात नारदऋषि प्राप्त झाले. त्यास तिनें आपला हेतु कळवितांच त्यांनीं सांगितलें कीं, तूं तपस्विनी आहेस त्यामुळें उत्तम लोक जरी तुला सुलभ आहे तरी तूं संस्कारहीन असल्यामुळें तुला अक्षय गति होणार नाहीं. यास्तव संस्कारयुक्त होऊन तू उत्तम लोक जिंकावास हें चांगलें. असें सांगून नारद गेल्यावर तिनें विवाह करावा असें मनांत आणून एके स्थळीं कांहीं ऋषिपुत्रांचा समुदाय वेदाध्ययन करीत होता तेथें ती गेली. आणि म्हणूं लागली कीं, " मी सांगते ऐका. जो कोणी या समाजांतून माझा पति होईल त्यास मी बहुत द्रव्य व अर्ध भाग माझें तप देईन." हें तिचें भाषण कोणी मान्य करिनात. कारण ती वृद्ध होती. तथापि त्यांत गालववंशोत्पन्न प्राक्शृंगवान् नामक एका ऋषिपुत्रानें तिचा पति होण्याचें स्वीकारलें त्यावरून त्या वृद्ध कन्येनें त्याशीं यथाशास्त्र विवाह केला व रात्रीं तरुण होऊन त्याच्या सेवेस ती सादर झाली. नंतर प्रातःकाल होतांच तिनें आपल्या वचनाप्रमाणें प्राक्शृंगवानास यथेच्छ द्रव्य व अर्धभाग तप दिलें, आणि देह त्यागून उत्तम लोकास गमन केलें."

(भार. प्रा. ऐ. कोश.)

री होणारा जाच ' असा आहे. आतां असा हा जाच सर्वच मुलींना होत असतो असें जरी ह्मटलें नाहीं तरी निदान थोड्या फार अंशांनीं तरी तो बहुतेक मुलींना अनुभवावा लागतोच यांत कांहीं संशय नाहीं. सासुरवाशीण या शब्दानें मुलींची जशी बापुड-वाणी स्थिति मनांत येते, तशी आह्माला वाटतें कीं, महाराष्ट्र भाषेंतील दुसऱ्या क्वचित् एखाद्या शब्दानें येत असेल. या स्थितींत आल्याबरोबर मुलींना आपली पोर-पणची स्वाभाविक अल्लड वृत्ति एकदम दाबून टाकून मुके-पणानें मोठें गंभीर व्हावें लागतें; यथेच्छ खाण्यापिण्याची संवय सोडून यदृच्छाहार ठेवावा लागतो; हौस नाहींशी करून मिळेल त्यांत संतोष दाखवावा लागतो; व वयपरत्वें आंगची स्वाभाविक नाजुकता विसरून जाऊन पक्कें सहनशील व कष्टकर व्हावें लागतें. सासुरवाशीण ह्मटली ह्मणजे तिनें सासरच्या कोणत्याही माणसाशीं मो-कळ्या मनानें हसतां बोलतां कामा नये; इच्छेप्रमाणें ए-खादी कांहीं वस्तु मागतां सवरतां कामा नये; कधीं कांहीं दुखल्या खुपल्यास कण्हतां कुरकुरतां कामा नये; व कसेंही आणि केव्हांही जड भारी काम पडलें तरी नाहीं होय ह्मणतां कामा नये. हें आह्मी काढीत असलेलें सासुरवास-शिणीचें चित्र कदाचित् कोणी अतिशयोक्तीचें आहे असें ह्मणेल; पण आह्मी खात्रीनें सांगतों कीं, बिलकुल तसें तें नाहीं. उलटें अशींहि बरींच स्थानें शोधपूर्वक पाहणारांस आढळतील कीं, त्यांत आह्मी काढलेल्या ह्या चित्राहून अधिकच करुणास्पद प्रकारांनीं युक्त अशी सासुरवाशीण

कामाचे गाडे ओढीत असेल, किंवा एखाद्या अंधेऱ्या कोंपऱ्यांत तोंड लपवून मुळुमुळू रडत बसली असेल! आतां यांत इतकें मात्र आह्मांला कबूल केलें पाहिजे कीं, सासुरवाशिणीची ही अशी बापुडवाणी स्थिति मुद्दाम तिचें वाईटच चिंतिण्याच्या बुद्धीनें फारच थोड्या ठिकाणीं होत असेल. बरोबर सासवा ह्मटल्या ह्मणजे त्या कजागच असतात असें नाहीं; परंतु अज्ञानपणाचें वारें जिकडे तिकडे पक्कें आंगीं खिळलें असल्यामुळें, आपल्या सुनेला चांगला मोळा लावण्याचा कित्येक सासवांचा सद्हेतुच असला तरी, गैर समजुतीनें आरंभिलेल्या त्यांच्या भलत्याच प्रकारच्या वागवण्यानें वरतीं वर्णन केलेली बापुडवाणी स्थिति त्यांजकडून मुलींना भोगावी लागते. घरांत एकदां सून आली ह्मटली ह्मणजे मग त्या घराचा यच्चयावत् कामधंदा तिनेंच उचलावयाचा जणूं काय मक्ताच घेतलेला असावयाचा; तहान भूक, सुखदुःख, भयशोक वगैरे मनोविकार सासुरवाशीण स्त्रीला मुळींच नसतात असा जणूं काय सासरच्या सर्व माणसांनीं आपल्या मनाचा पूर्ण ग्रह करून ठेवलेला असावयाचा; आणि *नणंदा, दीर वगैरेनीं तिजवर हवीं तीं कुभांडें घालावीं, तिला वाटेल तसें बोलावें याबद्दल जणुं काय

---

* ननांदा सानंदा हसितवदना भ्रूद्वहिनिका
कृतार्थाच श्वश्रूःकुपित दृशिपत्यौ मयिसखि ॥
सचेदुच्चैर्ब्रूते कठिन वचनैस्तर्हि सकलाः
करिष्यंति प्रायो वसनरहितास्तांडवविधिम् ॥ १ ॥
अर्थ—( एक सासुरवाशीण स्त्री आपल्या मैत्रिणीजवळ सां-

त्यांना कुलमुकत्यारच देऊन ठेवलेला असावयाचा ! अज्ञानानें सुनेला गैरसमजुतीचें वागवणें ह्मणून जें आह्मी वरतीं ह्मटलें तें हेंच होय. हा आमचा लेख कदाचित् आमच्या कित्येक वाचकांना रुचणार नाहीं. पण या लेखाला नाक मुरडण्यापूर्वीं तशा लोकांनीं पुढें दिलेल्या उताऱ्यांत सावित्रीचे विवाहप्रसंगीं द्युमत्सेन राजानें आपल्या सुनेविषयीं दाखविलेली खरी आदरबुद्धि कितीशा सासुसासऱ्यांच्या ठायीं वागत असेल याचा विचार करून पाहावा. सावित्रीचे बापास द्युमत्सेन ह्मणतोः—

"अप्रार्थित ही लक्ष्मी येते न येहि जी नवसून ॥
उभय कुलांतें उद्धारी ही निजभाग्यें नव सून ॥१॥
मानावी स्वस्नुषा सुतेपरि ती सासु-श्वशुरानीं ॥
वाटुं न द्यावें तिला सासरीं असतां पडलें रानीं ॥२॥
पोरबुद्धि ती क्षम्य सुनेची ह्मणून तत्प्रिय करणें ॥
प्रमाद होतां बोधावें परि रागें न तिला भरणें ॥३॥
सासुरवास प्रखर जाणविति सासरचीं तिस छळुनि ॥
अश्रुबिंदु मग सहज तिच्या मृदु गळती गालांवरुनी ४

सुनेविषयीं किती उदार विचार हे ! असले विचार सासुसासऱ्यांत आढळतील तर 'सासुरवास' हा स्त्रीवर्गास

गते ) "एके दिवशीं सहज इकडून कुठें मजकडे रागानें पाहणें झालें तों तेवढ्यानेंच नणंदांना आनंद झाला, वहिनींचें हास्यमुख झालें, आणि सासुबाईंना तर धन्यताच वाटली. यावरून मला जरा रागानें बोलणें झालं तर बाई खचित सांगतें कीं ह्या सगळ्या जणी हर्षानें वस्त्ररहित होऊन नाचूंच लागतील !" सारांश सासरच्या माणसांचें सासुरवाशिणीवर प्रेम असें असतें.

भोगावा लागणारा एक कठीण प्रसंग आहे असें ह्मणण्याचें कधींहि प्रयोजन पडणार नाहीं. उलटें ही स्थिति मुद्दाम प्रचारांत येण्याच्या मूळ उद्देशाप्रमाणें 'सासुरवास' ही एक अल्पवयस्क विवाहित मुलींना शाळाच आहे असें आह्मी ह्मणूं. व पुढील आयुःक्रमांत स्त्रियांना अत्यवश्य लागणारी संसारकार्यदक्षता व विशेषत: ज्याच्या सहवासानें संसारसमुद्र त्यांना तरून जावयाचा आहे त्या आपल्या पतीच्या स्वभाववर्तनाशीं एकत्वानें मिळून जाण्याची योग्यता ह्या दोन गोष्टी आंगीं येण्यास हीच एक शाळा उत्तम उपयोगी आहे असें खुशाल प्रतिपादन करूं. असु शेवटीं ह्या संबंधानें इतकेंच या ठिकाणीं सांगावयाचें कीं, ही दक्षता व योग्यता आंगीं आणून देणारी सासुरवासस्थिति ही आमच्या मुलींना शाळा आहे हा उद्देश सर्वांनीं पक्केपणीं मनांत बाळगला व त्या शाळेची शिक्षणव्यवस्था केवळ प्रेमबुद्धीनें ठेवली ह्मणजे या प्रसंगाचें भयप्रद स्वरूप तेव्हांच कमी होऊन सासुरवाशिणी मुलींनाही "सासरी जातां कुचकुच काटे। माहेरीं जातां हरिख वाटे" असें गाणें ह्मणून हिणवण्याचें कोणाला कारण पडणार नाहीं.

स्त्रियांवरील दुसरा प्रसंग ह्मटला ह्मणजे गर्भार बाळंतपण हा होय. हा प्रसंग विशेषतः वैद्यशास्त्राचा विषय असल्यामुळें याचे संबंधानें आह्मास विशेषरीतीनें कांहीं लिहिण्याचा अधिकार नाहीं. तरी एतद्विषयक कित्येक ग्रंथांच्या परिशीलनानें याविषयीं कांहीं सर्व साधारण विचार जे आह्मास या ठिकाणीं सुचवावेसे वाटतात तेवढेच आह्मी आपल्या वाचकांपुढें ठेवणार आहों.

गर्भारवाळंतपण ही स्थिति इतकी भयंकर मानली गेली आहे की, तींतून सुरक्षितपणें पार पडणें ह्मणजे खरोखरच स्त्रियांचा पुनर्जन्म होणें असें ह्मणतात. ही स्थिति स्त्रियांना नैसर्गिक आहे; तेव्हां वास्तविक ह्मटलें असतां ही इतकी भयप्रद नसावी. पण ज्या अर्थी हिला इतकें भयंकर स्वरूप येतें, या अर्थी तें कांहीं आगंतुक कारणें घडून येत असावें असें आह्माला वाटतें. अशा आगंतुक कारणांचे दोन प्रकार करतां येतील. एक अपथ्य, आणि दुसरा अडाणी समजुतीच्या गोष्टी. ह्या दोन प्रकारच्या आगंतुक कारणांचा जर पूर्वीपासूनच नीट बंदोबस्त राखला गेला, तर आह्मी खातरीनें सांगतों कीं, या स्थितीविषयीं इतकी कांहीं भीति बाळगण्याचें मुळींच कारण राहणार नाहीं.

अपथ्य प्रकारांत अकालीं संयोग ही एक गोष्ट विशेष खबरदारी घेण्यासारखी आहे. ऋतुदर्शनापूर्वीं स्त्रियांशीं व्यवहार धर्मशास्त्रानें अगदींच निषिद्ध करून ठेवला आहे. पण धर्मशास्त्राचीं बंधनें वाटेल तशीं सैल करून ठेवणें शक्य असलें ह्मणजे या बाबतींत त्यांचा कांहीं पगडा चालत नाहीं. धर्मशास्त्राप्रमाणेंच वैद्यशास्त्रानेंही या प्रकारच्या व्यवहारास प्रतिबंध सांगितला आहे. ऋतुदर्शनापूर्वीं तर काय पण ऋतुदर्शनानंतरही स्त्रीपुरुषसंयोगास वैद्यशास्त्राच्या कांहीं मर्यादा आहेत. वैद्यशास्त्र हें प्रत्यक्ष शास्त्र असल्यामुळें त्याच्या नियममर्यादा उल्लंघिल्या असतां असल्या अशास्त्रव्यवहारापासून त्यानें सांगितलेले एकेक अनिष्ट परिणाम तत्काल अनुभवास आल्यावांचून कधींच

राहत नसतात; पण त्या परिणामाशीं पुरुषवर्गाचा प्रत्यक्ष संबंध प्रथमदर्शनीं थोडाच असला ह्मणजे व स्त्रियांना तो जाणवूं लागण्याचा प्रसंग त्यांजवर येण्यापूर्वीच तसला व्यवहार त्यांजकडून जुलुमानें घडविला गेला ह्मणजे ह्या-ही शास्त्राचे सांगण्याचा किंवा प्रत्यक्ष दर्शनाचा कांहीं उपयोग होत नाहीं. पण अशी बेपरवाई असणें हें कांहीं चांगलें नाहीं. या कामीं धर्मशास्त्राचा निषेध व वैद्यशास्त्राचा प्रत्यक्ष बोध हा सर्वांनीं मानलाच पाहिजे. आणि तो योग्य रीतीनें मानला जात आहे किंवा नाहीं हें पाहण्याची जबाबदारी गुरुजनांनीं आपल्या शिरावर वाहिलीच पाहिजे. लोकांत शहाणपणा किती जरी वाढला, आणि व्यक्तिस्वातंत्र्याचें वारें कसें जरीं संचरलें असलें तरी गुरुजनांची सत्ता कायमच असली पाहिजे; कारण शास्त्रांनीं ठरविलेल्या नियमांची उत्सृंखळ, अपेक्त व तर्तरीत नव्या मंडळीवर अंमल बजावणी त्यांच्या सत्तेवांचून होणें फार कठीण आहे.

गर्भारस्थिति प्राप्त झाल्यापासून स्त्रियांचें वागणें कसें असावें, खाण्यापिण्याची व्यवस्था कशी राखावी, आपली राहणी कशी ठेवावी वगैरे अनेक गोष्टी वैद्यशास्त्रानें सांगितलेल्या आहेत, त्यांच्याकडे होत असलेलें दुर्लक्ष्य हें देखील आणखी आह्मी या अपथ्यप्रकारांतच गणतों. हें दुर्लक्ष्य होण्याचें कारण इतकेंच कीं, या प्रकारची माहिती आमच्या स्त्रियांना पाहिजे तशी नीट रीतीनें प्रत्यक्षत: मुळींच मिळत नाहीं. गर्भारवाळेंतपण जड जाण्याला हें अज्ञान त्यांना कमी जाचतें असें नाहीं. याकरितां

आपल्याला पुढे मागें भोगावा लागणारा प्रसंग सुखकर रीतीनें पार पडावा ह्मणून जीं पथ्यें आपणास संभाळलीं पाहिजेत तीं आपणास होतील तितक्या प्रयत्नांनीं अवश्य माहीत असावीत. ही माहिती हल्लीं कित्येक स्त्रियांना असते त्याप्रमाणें फक्त तांत्रिक ऐकीव नसावी. असल्या सांगोसांगीपेक्षां ती शास्त्रोक्त असणें हें इष्ट आहे.

अगदीं आवश्यक गोष्टींतलीसुद्धां अशी शास्त्रोक्त माहिती समजण्याचें साधन जें ज्ञान, त्याचा आज कित्येक कालपर्यंत आमच्या स्त्रीवर्गाला व्हावा तसा पुरवठा होत गेला नसल्यानें, गर्भारबाळंतपणासारखा प्रसंग त्यांना जड जाण्याला वरतीं सांगितल्याप्रमाणें जशीं अनेक अपथ्यें त्यांजकडून घडलीं जातात, तसाच तत्संबंधी कित्येक गोष्टींत त्यांचा जो कांहीं अडाणीपणा पुष्कळच दिसून येतो तोही कारण होतो. ह्मणजे असल्या अडाणीपणापासून देखील त्यांना नुसता त्रासच नव्हे, तर इजा आणि धोकासुद्धां घडण्याचा पुष्कळ संभव असतो. गर्भारपणची वागणूक, बाळंतपणाची व्यवस्था, बाळंतिणीची खोली, तिच्या तैनातीस असलेली सुईण वगैरे या प्रसंगांतल्या कित्येक गोष्टींकडे हल्लीं जर आपण तद्विषयक शास्त्राची दृष्टि घेऊन पाहूं लागलों, तर आमच्या स्त्रियांची गर्भारबाळंतपणांतून सुटका ह्मणजे त्यांचा नवाच जन्म होय, असें मनांत येणें हें अगदीं साहजिक आहे. आतां हें अपथ्य आणि हा अडाणीपणा काढून टाकावयाचा झटला ह्मणजे आमच्या समजुतीनें त्यास एकच उपाय दिसतो व तो हाच कीं, या प्रसंगाविषयीं

स्त्रियांना पूर्णरीतीची चांगली शास्त्रोक्त माहिती करून दिली पाहिजे.

वैधव्य, हा दुर्दैवानें कित्येक लहान मोठ्या स्त्रियांवर गुजरणारा तिसरा एक प्रसंग आहे. ह्या दुर्धर प्रसंगाची धाड कोणावर केव्हां येऊन पडेल ह्याचा कांहींच नियम सांगतां येणार नाहीं. ती एकदां आली ह्मणजे स्त्रियांना आपल्यावर दुःखाचाच डोंगर कोसळल्याप्रमाणें होतें! ह्या परम शोचनीय प्रसंगाचें वर्णन केलेलें कोठें वाचलें तरी अंतःकरणास कळवळा येतो; मग ही स्थिति आलेली पहाणारांची किंवा प्रत्यक्ष ती अनुभवणारिणींची दशा काय विचारावी! ह्या दुःखद स्थितींतून आमच्या अनाथ स्त्रियांना होईल तितकें बचवावें ह्मणून आजपर्यंत पुष्कळ नवीन विद्वज्जनांचें लक्ष्य वेधलें आहे. व कित्येकांनीं पुनर्विवाहादि कांहीं प्रकार प्रचारांत आणण्याची खटपट सुरू करून हा प्रसंग होईल तितका सौम्य करण्यास ते लागले आहेत. पण पति ह्मणजे आपलें दैवत, पातिव्रत्य हा आपला धर्म आणि पतीच्या संसाराचें संरक्षण हेंच आपलें कर्तव्यकर्म असें दृढव्रत आपल्या मनांत बाळगून बसणाऱ्या आमच्या बहुतेक स्त्रियांच्या मनाला वैधव्य दुःखाचे प्रसंगीं पुनर्विवाह, नियोग, विधवारक्षकगृहें इत्यादि सोयी कितपत समाधानकारक वाटणार आहेत याची आह्मास शंकाच आहे. याहून अन्यवृत्तीच्या स्त्रियांना मात्र असे कांहीं राजमान्य प्रकार सुरू असले ह्मणजे विशेष सोईस्कर असतें हें खरें. आह्माला तर या प्रसंगाविषयीं आज फक्त दोनच तऱ्हांचे उपाय सुचताहेत. त्यां-

पैकीं एक उपाय ह्मटला ह्मणजे, कांहीं विशेष सावधगि रीच्या गोष्टींनीं तो प्रसंग टाळण्याची अगोदरच यथाशक्ति तजवीज ठेवणें. आणि दुसरा असा कीं, दुर्दैवानें तो प्राप्त झालाच तर त्याला धर्मशास्त्रनियमांप्रमाणें धीटपणें अनुसरणें. बालविवाहाची चाल बंद होत गेली, बालावृद्ध-विवाह अगदीं नष्ट झाले, 'किंवा वाग्निश्चय आणि विवाह-विधि या दोन संस्कारांतील कालमर्यादा वाढविली तर या प्रकारच्या तजवीजींनीं शोचनीय वैधव्यप्रसंग बरेच कमी होणार आहेत. यांपैकीं पहिल्या दोन-ह्मणजे बालविवाह व बालावृद्धविवाह-यांच्या संबंधानें आजपर्यंत पुष्कळ चर्चा झाली आहे व हळुहळु या अनर्थमूलक चाली मागें पडत जाण्याचा बराच सुमार दिसत आहे. तेव्हां त्यांज-विषयीं येथें जास्त विस्तार आह्मी करीत नाहीं. आतां वाग्निश्चय व विवाहविधि यांतील कालमर्यादा वाढ-विण्याविषयीं जें ह्मटलें आहे, तें मात्र अजून लोकविचारांत फारसें आलेलें आढळत नाहीं. यासंबंधानें विवाहविधींत हल्लीं रीत ह्मटली ह्मणजे अशी आहे कीं, विवाहासाठीं नवरामुलगा आणावयास हवावत जातें आणि इकडे तितक्या वेळांत वाग्निश्चय उरकून घेतला जातो; पण वाग्निश्चयानंतर विवाह इतक्या अल्प कालानेंच करावा अशाविषयीं शास्त्राची बिलकूल अनुज्ञा नाहीं. आपल्या सोईचें मिळालेलें स्थळ हातचें जाऊं नये ह्मणून वाग्निश्चय करून ठेवून पुढें विवाह संस्कार खुशाल योग्यवेळीं करावा. अशा पद्धतीपासून अनेक प्रकारचे फायदे आहेत. मुलाचीं गुणकर्में बराच काळपावेतों आपणास अनुभवावयास सां-

पडतात, किंवा त्याच्या घरची चालरीत पाहतां येते व तीं आपल्या मनास पटलीं नाहींत किंवा कांहीं बरा वाईट प्रसंग घडला, तर मुलीच्या जन्माचें नुकसान होऊं न देतां, योग्यरीतीनें तो वाग्निश्चय रद्द ठरवून ती मुलगी अन्य ठिकाणीं देतां येते.

आतां यथाशक्ति आपल्याकडून व्यवस्थितपणा ठेवतां ठेवतां दुर्दैवानें वैधव्यदशा प्राप्त झालीच, तर त्यानंतरचा काळ ज्या नियमव्रताचरणांत स्त्रियांनीं दवडावा ह्मणून आमच्या धर्मशास्त्राची आज्ञा आहे, त्यासंबंधानें आम्हास असें सांगावयाचें कीं, ती आज्ञा फक्त धार्मिक मनुष्या करितांच आहे. ज्यांना धर्मवृत्तीची ओज असेल त्यांनीं धर्मशास्त्रोक्त आज्ञा श्रद्धाबुद्धीनेंच ऐकून पाळावयाच्या आहेत. त्याच्यावर वकेली कोट्या लढवून, अथवा अनेक प्रकारचे मतलबी तर्क चालवून किंवा पुरुष अनेक लग्नें करतात अशा प्रकारच्या सबबी काढून त्यांचा उपहास, किंवा उपेक्षा करण्यासारखी आणि त्यांना व्यर्थत्व आणण्यासारखी त्यांचीयोग्यता नाहीं. धर्म ह्मणून कांहींएक उत्तमप्रकारचें समाजाला बंधन असतें ही गोष्ट ज्याला मान्य नाहीं, एक विषयसुख अंतरलें ह्मणजे सर्व ऐहिक व्यवहार शून्य झालें अशी ज्याची समजूत आहे, व वैधव्य आलें असतां पुनर्विवाहाशिवाय पुरुषार्थसिद्धीचा अन्य मार्गच स्त्रियांना नाहीं असें ज्याला वाटत आहे, अशा मनुष्यासाठीं ते शास्त्रोक्त धर्म नाहींतच. त्याला अन्यथा मनसोक्त वर्तन ठेवण्याचे मार्ग आज मोकळे आहेत. पण आमच्या वाचकमंडळींत तसल्या समजुतीचीं माणसें असतील असें आ-

ह्यास वाटत नसल्यामुळें आम्ही दुर्दैवानें वैधव्यदुःखमग्न, स्त्रियांचें सांत्वन 'धर्मशास्त्रास अनुसरून चालावें' एवढ्याच शब्दांनीं करण्यास आज सिद्ध आहों. धर्मशास्त्रांनीं विधवा स्त्रियांस कोणत्या प्रकारची वर्तनदिशा दाखविली आहे त्याचें थोडेंसें दर्शन होण्याकरितां पुढें एक लहानसा प्राकृत ग्रंथांतला उतारा दिला आहे.

( ओंव्या. )

"तिणें असावें विधवापणें । विधिपूर्वक धर्म आचरणें ॥
सहगमना समानें । असे पुण्य परियेसा ॥ १ ॥
करणें केश वपन । करावें नित्य प्रातःस्नान ॥
एकवेळां भोजन । करावें तिणें परियेसा ॥ २ ॥
करूं नये मंगलस्नान । अथवा देहमर्दन ॥
गंध परिमल तांबूल जाण । पुष्पादि तिणें वर्जावें ॥३॥
विष्णुपूजा करावी नित्य । आपला पुरुष हा निश्चित ॥
पुरुष आठवूनि चित्त । विष्णुस्थानीं मानिजे ॥ ४ ॥
पुरुष असतां जेणेंपरी । पति निरोपें आचार करी ॥
तेणेंचिरीतीं विष्णु अवधारीं । त्याचे निरोपें आचरावें ५
तीर्थयात्रा उपास व्रत । विष्णुनिरोपें करावें निश्चित ॥
अथवा गुरुद्विज विख्यात । त्याचे निरोपें आचरावें ६
आपण असतां सुवासिनी । ज्या वस्तूची प्रीति अंतःकरणीं
तैशी वस्तु द्यावी धणी । विद्वज्जन विप्रासी ॥ ७ ॥
जें जें दान द्यावें द्विजा । पतीच्या नांवें अर्पिजे बोजा ॥
संकल्पूनि पुरुष काजा । धर्म करणें येणेंपरी ॥ ८ ॥
जेथें असावें तिये नारी ॥ न बैसावें वाहनावरी ॥
लेवूं नये कंकण चोळी करीं । श्वेतवस्त्र नेसावें ॥ ९ ॥

आत्म्याचें पुत्रनाम । म्हणूनी बोलती वेदागम ॥
पतीपासून पुत्रजन्म । पुत्रांत असावें ॥ १० ॥
ऐसा आचार विधवेसी । असे शास्त्रपुराणेंसी ॥
जरि आचरती भक्तीसी । सहगमनाचें फळ असे ११
विधवापणें येणेंपरी । आचरण करतां नारी ॥
मरण होतां सत्वरीं । घेवोनी पति स्वर्गीं जाय ॥१२॥

—श्री गुरुचरित्र

आपलें सुखसर्वस्व ज्यावर अवलंबून असा आपला प्रियपति नष्ट झाला म्हणजे स्त्रियांना प्राप्त होत असलेली वैधव्यावस्था स्वभाविक दुःखकारक तर वाटतेच; पण तशा स्थितींत पुढें त्यांना समाजाकडून तर काय, पण खुद्द तिच्या घरच्या माणसांकडूनसुद्धां चांगल्या प्रकारें वागविलें जात नाहीं, यामुळें तिचें ते दुःख तिला दुप्पट दुःसह होण्यास मात्र कारण होत असतें. गतभर्तृकांस कसें वागवावें एतद्विषयीं आजकालच्या एका राजमान्य पुरुषाचे कांहीं विचार नुकतेच एके ठिकाणीं आमच्या पाहण्यांत आले ते असे.

"गतभर्तृकांसारखें अत्यंत हतभाग्य व अनुकंप्य जीवित दुसऱ्या कोणाचेंही नाहीं, हें कधींही विसरतां कामा नये; हातानें आणि तोंडानें तिच्यावर जितकी ममता करवेल तितकी केली पाहिजे. तिच्याशीं मानपुरःसर प्रेमाचें वर्तन ठेविलें पाहिजे. निर्दय मुद्रेनें, स्वरानें किंवा दुसऱ्या कोणत्याही भावनें तिला कधींही दुखवूं नये. तिला वाईट लोकांची संगति लागूं देऊं नये. तिच्या पैशाला किंवा दागदागिन्याला अणुमात्र हात लावूं नये. कोणाकडूनही

तिचें वंचन होऊं देऊं नये. खुद्द गृहपतीनें किंवा घ-रांतील दुसऱ्या कोणत्याही इसमानें तिच्यापासून बिलकूल कांहीं उसनें घेऊं नये. कारण तें परत मागण्याची तिला मोठी अडचण वाटते, आणि न मागितल्यामुळें घेणारास परत करण्याचा विसर पडतो. होतां होईल तों तिची बसण्याउठण्याची व निजण्याची जागा निवांत, कोरडी, व स्वच्छ असावी; शौच कुपाच्या, मोरीच्या, न्हाणीच्या किंवा गोठ्याच्याजवळ असूं नये. साधें अन्न व वस्त्र यांची तिला कधीं तूट पडूं देऊं नये. जर कधीं ती आजारी पडली, तर तिच्या औषधपाण्याची व पथ्याची चांगली व्यवस्था ठेवावी. मुलांची बरदास्त ठेवणें, देवपूजेचीं उप-करणीं घांसणें, गाई म्हशींची वास्तपुस्त करणें, भिक्षेक-ऱ्यांस भिक्षा घालणें, घरच्या देवांच्या पूजेसाठीं फुलें आणणें, स्वयंपाकासाठीं डाळ तांदुळ घेणें वगैरे सुलभ कामें तिच्यावर सोंपवावीं. किरकोळ हातखर्चासाठीं व देवधर्मासाठीं तिला दर महिना चार दोन आणे आठव-णीनें उचलून द्यावे. वाटेल तेव्हां तिला आपल्या आई-बापांस, भावांस व बहिणींस भेटूं द्यावें. चांगल्या बायकां बरोबर किंवा पुरुषांबरोबर मोठमोठ्या देवांला किंवा ती-र्थांला जाण्यास तिला हरकत करूं नये. घरांतील इतर माणसांशीं तिला होईल तितकें मिळूं मिसळूं द्यावें, व क-मेणूक करूं द्यावी. घरांतील इतर माणसें कधीं एखाद्या देवाला, यात्रेला, किंवा अशाच प्रकारचें दुसरें एखादें चित्तरंजन करण्याला बाहेर पडलीं तर तिलाही बरोबर घ्यावें. सर्वांच्या सल्लामसलतीनें कांहीं गोष्ट करावयाची

असली तर तिला तींत अवश्य घ्यावें. ती पोक्त झालेली असेल तर तिची मसलत खचित फायदेशीर होण्याचा पुष्कळ संभव असतो." —सुधारक.—

विधवा स्त्रियांना अपेशी, ऋणाइती, भूभारवत् वगैरे समजून त्याप्रकारचेंच त्यांच्याशीं वर्तन ठेवणें हें खरोखरच मनुष्यपणास कलंक आणणारें होय. वरल्या उताऱ्यांत सांगितल्याप्रमाणें त्यांशीं जर बहुमानाचें, व प्रेमाचें वर्तन ठेवलें तर त्यांच्यापासून कुटुंबांत फार फायदा होणार आहे. त्यांची कांहींशी स्वतंत्र स्थिति व या दुर्दैवावस्थेमुळें त्यास सांपडणारी जास्त फुरसद यांचा योग्यरीतीनें उपयोग करून घेतल्यास त्यांच्यापासून कुटुंबसुधारणेस, मुलांच्या गृहशिक्षणास व प्रापंचिक सुव्यवस्थेस चांगलीच मदत होणार आहे.

प्रकरण सहावें समाप्त.

---

# पौराणिक स्त्रियांच्या कथा.

## ( प्रकरण सातवें. )

—:०:—

" थोरांचीं सचरितें असती लोकांतें अनुकार्य ॥
" त्यांविण संसृति जन्य संकटें असताति अपरिहार्य १

पौराणिक स्त्रियांच्या कथा ह्या प्रकरणांत आह्मीं दिल्या आहेत. यांपासून वाचक जनांस करमणूक तर होईलच, पण विशेषतः—बोध होण्यासारखा भाग या कथांत पुष्कळ आहे. विशेषतः आमच्या स्त्रियांनीं हीं चरित्रें ऐकलीं अगर वाचलीं

असतां त्यांच्या अंतःकरणांत अनुकरणवृत्ति साहजिक उत्पन्न होणार आहे. आणि तसें झालें असतां त्यांना आपली योग्यता वाढविण्याचा मार्ग सुलभ वाटेल यांत संशय नाहीं.

---

## शांडिली आणि सुमना यांचा संवाद.

—•—:०:——

सुमना—हे कल्याणि, कोणत्या प्रकाराचें आचरण केल्यानें आज बाई तूं विमानांत बसून देवलोकास चालली आहेस? व अग्निज्वालेप्रमाणेंही तेजस्विता तरी तुझ्या आंगीं कशानें बरें आली आहे? खचित सांगत्यें कीं, केवळ कांहीं व्रत-नेमादि आचरल्यानेंच हें ऐश्वर्य तुला प्राप्त झालेलें नाहीं. तुझा तो कल्याणप्रद मार्ग ऐकण्यास मी पात्र आहे, याक-रितां तो तूं मला सांगच.

शांडिली—बाई सुमने, हा मार्ग अगदीं सुलभ आहे. याच्या प्राप्तीकरितां घोरतर तपश्चर्या नको, जटावल्कलें परिधान करून अरण्यवास नको, किंवा उपवास व्रत नि-यमांनीं देहही कष्टविणें नको. फक्त आपण आपलें कर्तव्य ओळखून तें कंठगत प्राण झाला तरी सोडावयाचें नाहीं एवढा आपला निश्चय असला म्हणजे पुरे. बाई गे आपणा स्त्रियांचीं कर्तव्य कर्मं मी तुला थोडक्यांतच सांगते तीं तूं नीट चित्त देऊन श्रवण कर. हें बघ आपण स्त्रियांनीं कधीं कोणाशीं उन्मत्त पणानें वागूं नये. कठोर आणि अहितकारक असें भाषण पतीशी त्याचप्रमाणें इतरही को-णाशीं करूं नये. देव, पितर आणि ब्राह्मण यांच्या पूजे-विषयीं सर्वदां तत्पर असावें. सासु, श्वशुर इत्यादि गुरु-

जनांची नेहमीं सेवा करावी. त्यांचा कदापि अपमान करूं नये. गुरुजनांशीं दुर्लक्ष्यपूर्वक वर्तन ठेवल्यानें आपलें कधींही कल्याण व्हावयाचें नाहीं हें तूं पक्कें लक्ष्यांत ठेव. पतीचा देवाप्रमाणें सन्मान राखावा. त्याशीं भक्ष्यभोज्यादि पदार्थांत कदापि वंचना करूं नये. तो गृहीं असतां त्याच्या सन्मुख प्रसन्नतेनें व सालंकृत होऊन वागावें. शृंगारादि गोष्टी त्याच्या पश्चात् वर्ज्य कराव्यात. संपत्काल किंवा विपत्काल कोणताही काल असला, तरी पतीशीं अनुकूल वृत्तीनेंच असावें. पतीचें वित्त व जीवित या दोहोंचें संरक्षण करण्याविषयीं सदा दक्ष असावें. याप्रमाणें पतिव्रता स्त्रियांचे जे धर्म आहेत तेच स्त्रियांनीं पाळले ह्मणजे त्यांस सद्गति होते. सुमने, आपणा स्त्रियांना श्रेयस्कर असा आचरणाचा श्रेष्ठ प्रकार हाच आहे. एवढा लक्ष्यांत ठेवून तूं आपल्या वागण्यांत तो आण, ह्मणजे भगवत्कृपेनें जो लोक हल्लीं मला प्राप्त झाला आहे तोच तुलाही प्राप्त होईल.

---

# द्रौपदी आणि सत्यभामा यांचा संवाद.

सत्यभामा—बाई द्रौपदी, लोक कांहींही ह्मणोत, परंतु मी तुला खरेंच सांगत्यें कीं, माझ्या कडे श्रीकृष्णाचें मन क्षणभर देखील लागत नाहीं. आणि तेंच तुझें पहावें तों तुला पांचभ्रतार असून त्या पांचांचेंही प्रेम तुजवर इतकें कांहीं आहे कीं, मेघमाला पाहतांच मयूर जसे

आनंदानें नाचूं लागतात, त्याहून देखील जास्त तुझ्यावर तुझे पति लुब्ध आहेत. तर तूं कोणत्या अशा वशीकरणा-नें किंवा मणिमंत्रौषधींनीं आपल्या पतींचें मन आपणाकडे आकर्षून घेतलें आहेस? मला तरी सांग बाई.

द्रौपदी (हंसून) सत्यभामे, काय ह्मणतेस? आपल्या पतीचें मन आपणाकडे लावून घेण्यास मणिमंत्रादि उपाय लागत असतात? इश्श! मला बाई हें ऐकण्याससुद्धां लाज वाटते! प्रेमानें आपल्या पतीची सेवा करून त्याला आपण प्रिय व्हावें, असें न करितां जी स्त्री आंगारेधुपारे करून त्याला आपणास वश करून घेण्यास पाहते अशी साहसी बायको खचित निंदेसच पात्र होय. मला तर बाई असलें कांहीं माहीत नाहीं. माझें वशीकरण कोणतें ह्मणून विचारशील, तर ज्या आपल्या आचरणानें पतीस राग येणार नाहीं असें आचरण ठेवणें, हेंच होय. पती-शीं गर्वानें, उद्धटपणानें व तसेंच मत्सरानें व कपटानें कदापि वागलें नाहीं ह्मणजे आपलें आचरण पतीच्या को-पास कारण होत नाहीं. तसेंच पतिव्रता स्त्रियांना पति हाच परमेश्वर असल्यानें त्याच्या चरणाची सेवा न करि-तां त्याचें प्रेम आपणावर असावें ह्मणून जी स्त्री अन्य दैवतांस नवससायास करीत फिरते ती किती मूर्ख ह्मणा-वी बरें! सत्यभामे, तुला मी सांगत्यें कीं, आपल्या पती-ची प्रसन्नता संपादल्यानें साध्वी स्त्रियेला जी सद्गति मिळ-ते, ती मोठ्या एखाद्या योगयागानें सुद्धां मिळत नाहीं. पार्वतीनी पहाना, गंगेविषयीं सवतीमत्सर टाकून तिला आ-पल्या माथ्यावर घेण्यास जेव्हां तयार झाली, तेव्हांच ती

आपल्या पतीला अत्यंत प्रिय व त्याची खरी अर्धांगी होऊन बसली आहे. याकरितां वेडे, असलें उत्तमाचरणच आपल्या पतीचें मन आपणाकडे वेधलें जाण्यास उत्तम वशीकरण आहे, समजलीस !

# सावित्री.

पूर्वी मद्रदेशांत अश्वपति नामक कोणीएक न्यायशील राजा होता. त्याच्या पत्नीचें नांव मालती. अश्वपति राजास संतति नसल्यामुळें तत्प्रीत्यर्थ त्यानें 'सावित्री' नामक एका देवीची दहा महिने आराधना करून तिला सुप्रसन्न करून घेतलें; आणि पुत्र तर नाहींच, पण उभय कुलांचा उद्धार करणारी अशी रूपगुणसंपन्न एक कन्या होईल असा आशिर्वाद देवीजवळून मिळविला. त्या आशीर्वादाप्रमाणें पुढें त्याची भार्या, मालती, हिला गर्भ राहून नऊ मास पूर्ण होतांच देवीनें वर दिल्याप्रमाणें उत्कृष्ट कन्यारत्न झालें. देवीचा प्रसाद ह्मणून त्या कन्येचें नांव अश्वपतीनें 'सावित्री' हेंच ठेवलें. ही कन्या दिवसांमासांनीं वाढून पुढें उपवर झाल्यावर तिच्या विवाहविषयीं राजानें आपल्या मंत्रीमंडळास सल्ला विचारतां, त्यांनीं ह्या कन्येची रूपगुणसंपन्नता अतिशय पाहून ही स्वयंवर करण्यासच योग्य आहे असें सांगितलें. तेव्हां राजानें मंत्री, वृद्धपुरोहित आणि सैन्य बरोबर देऊन कन्येस आपल्या मनाजोगा पति पाहून येण्यास आज्ञा केली.

पति पाहण्या करितां सावित्री देशोदेशीं हिंडतां हिंडतां एका रम्य वनांत तिच्या सैन्याचा तळ पडला. तेव्हां एके दिवशीं आपल्या सखीला बरोबर घेऊन सावित्री वनशोभा पाहत तेथील एका सरोवराचे कांठीं आली. तों वेषानें ऋषिपुत्रसम पण रूपतेजानें क्षत्रिय असा कोणी एक कुमार स्नानाकरितां तेथें येतांना तिला आढळला. त्यास पाहतां-च सावित्री मोहित होऊन हाच आपणास पति योग्य आहे असें तिच्या मनानें घेतलें. व आपल्या सखीकडून त्याचें सर्व वृत्त श्रवण करून, त्याशींच विवाह करण्याचा निश्चय ठरवून ती सैन्यसचिवांसह आपल्या नगरास परत गेली.

पुढें एके दिवशीं पति पाहण्यास निघाल्याची सर्व हकीकत सावित्री अश्वपतीस सांगत असतां त्या ठिका-णीं नारदमुनींची स्वारी आली. त्यांचें स्वागत झाल्यावर अश्वपतीनें प्रार्थना करून त्यास संमति विचारली कीं, ही माझी एकुलती एक कन्या, सावित्री, नुकतीच प्रवासाहून पतिनिश्चय करून आली आहे. हिनें द्युमत्सेन ह्मणून कोणी राज्यपदच्युत व अंध असा राजा आपल्या स्त्रीसह तपोवृत्तीनें एके वनांत राहात आहे, त्याचा पुत्र स-त्यवान यशीं विवाह करण्याचा निश्चय केला आहे. आपण त्रिकालज्ञ आहां तेव्हां हा शरीरसंबंध आपल्या विचारास कसा-काय येतो हें कळविण्याची कृपा व्हावी. अश्वपतीची ही विज्ञप्ति ऐकून नारदानीं क्षणभर अंतर्दृष्टि लाविली; आणि नंतर भाषण करण्यास प्रारंभ केला. ते ह्मणाले कीं, स्त्रियां-नां विधिपूर्वक पतिलाभ हा एकवारच होत असतो. या-करितां त्यांचें परिणयन करतांना वरपक्षा कडील कुलशील

वयवृत्ति वगैरेबद्दल नीट परीक्षण करून मग विवाह नातें जोडावें. राजा, हल्लीं तुझ्या या मुलीनें जो पतिनिश्चय केला आहे तो तुमच्या योग्यतेला फारच कमी आहे. याकरितां मला वाटतें कीं, तूं त्याचप्रमाणें तुझ्या या मुलीनेंहि हा विचार सोडून द्यावा हें बरें."

नारदमहामुनींचें हें भाषण ऐकून सावित्री फार नम्रपणानें ह्मणाली कीं, "महाराज, आपलें वचन योग्यच आहे. व त्यांतून वडील माणसें सांगतील तें निमूटपणें ऐकण्याचेंच नातें मजकडे आहे; तरी प्रेमाची गांठ एकदां पडली कीं ती मग कशानेंही सुटत नाहीं, याला काय करावें?" यावर नारदानीं तिला एकीकडे नेऊन सांगितलें कीं, "मुली, तूं ह्मणतेस तशी प्रेमाची गोष्ट आहे खरी; पण एखाद्या अयोग्य ठिकाणीं प्रेम ठेवून पुढें दुःखाची जोड करून कां ठेवतेस बरें? तूं जो पति पाहून आली आहेस तो नुसता यशैश्वर्यविहीन आहे ह्मणून त्याशीं मी संबंध नको ह्मणून ह्मणत नाहीं. यश व ऐश्वर्य हीं केव्हां ही उद्योगानें प्राप्त करून घेतां येतील; पण तो सत्यवान् अल्पायुषी असल्यामुळें लौकरच मृत्युमुखीं पडणार आहे. तेव्हां अशाचे पदरीं पडून व्यर्थ सौभाग्यहानि कां करून घेतेस?"

नारदाचें हें भाषण ऐकून मात्र सावित्रीच्या पोटांत धस्स झालें. शांत वनांत राहून पतिसमागमें सासुसासऱ्याची सेवा करीत सुखानें आयुष्य घालविण्याचा जो तिचा मनोरथ तो एकदम नष्ट झाला. तरी थोर पुरुषांप्रमाणें तिणें विचार करून आपला दृढनिश्चय नारदमहामुनीस

ती येणेंप्रमाणें सांगूं लागली. ती ह्मणाली, मनुष्याचे प्रत्यक्ष देहव्यापार घडण्यास ज्या अर्थी मन हेंच मूळ कारण आहे, त्या अर्थी मनानें जी एकदां गोष्ट ग्रहण केली ती देहानेंही ग्रहण केल्याप्रमाणेंच आहे. तेव्हां सत्यवानास ज्यापक्षीं मी मनानें पतिभावानेंच घेतलें आहे, त्यापक्षीं आतां तो अल्पायुषी असो किंवा कसाही असो, तो मला सोडतां येत नाहीं. त्याच्याठिकाणीं माझी पतिनिष्ठा आतां कायम झाली.

सावित्रीची ही सत्यनिष्ठा पाहून नारदमहामुनीला परम संतोष वाटला. व तिला 'सौभाग्यश्रीवर्धक' असा आशीर्वाद देऊन ते निघून गेले. पुढें सुमुहूर्तावर 'सावित्रीसत्यवानाचा' त्या वनांतच विवाह झाला. विवाहानंतर सावित्री आपलें राज्यवैभव सोडून पतीबरोबर सासुसासऱ्यांची सेवा करीत सुखसमाधानानें तेथें राहिली.

एके दिवशीं आपल्या पतिनिधनाचा जो काळ नारदमुनीनें सांगितला होता त्याचें तिला सहज स्मरण झालें व तो अगदींच नजीक येऊन ठेपलासा पाहून तर तिचें चित्त फारच घाबरलें. तिला कामधंदा सुचेनासा झाला, नेहमीं घरांत वागतांना तिची जी उल्हासवृत्ति असे ती जाऊन ती उदास झाली, व एखादा महा सर्प जसा पुरलेल्या द्रव्यावर संरक्षणार्थ टपून बसलेला असतो तशी ती पतीच्या जीवितधनाच्या रक्षणार्थ ह्मणून निरंतर त्याच्यानिकट राहूं लागली. त्यास आपल्या दृष्टीपुढून क्षणभरही एकीकडे होऊं देईना. शेवटीं 'ज्येष्ठशुद्ध पौर्णिमेच्या' दिवशीं सायंका-

ळीं नित्याप्रमाणें समिधापुष्पें वगैरे आणण्यास सत्यवान निघाला असतां सावित्रीही सासुसासऱ्यांची आज्ञा घेऊन त्याजबरोबर गेली. वाटेनें तिची उदासीनता जाऊन तिनें प्रसन्नचित्त व्हावें ह्मणून भोंवतालची मनोहर वन-शोभा दाखवून व प्रेमळ गोष्टी बोलून सत्यवानानें आपली पराकाष्ठा केली, पण व्यर्थ. उलटें असा आपणा-वर अकृत्रिम प्रेम करणारा पति आतां लौकरच आपणास अंतरणार हेंच मनांत येऊन तिला अधिकाधिक दुःखाचे उमाळे फुटूं लागले. सायंकाळचे सुमारास एका वटवृक्षावर चढून सत्यवान समिधा तोडीत असतां व त्याजवर दृष्टि लावून सचिंत मुद्रेनें खालीं त्याची पत्नी सावित्री बसली असतां, त्यास आपल्या मस्तकांत शूळ उठल्याची भावना झाली. ह्मणून तो खालीं उतरून विश्रांतीसाठीं सावित्रीचे मांडीवर मस्तक ठेवतो आहे, इतक्यांत त्यास मूर्च्छा आली, व लगेंच त्याचें प्राणोत्क्रमणही झालें. ! त्या वेळीं सावित्रीची अवस्था काय विचारावयाची आहे. तिनें अतिशय शोक केला; व आपल्या दीन स्वरानें भोंवतालच्या वृक्षपाषाणासही करुणा आणली ! परंतु उपयोग काय ! शेवटीं आपल्या पतीचे प्राण हरण करून यमराजाची स्वारी दक्षिण दिशेनें चालली आहे असें पाहून ती त्यांच्या मागोमाग पतिप्राणासमागमें जाण्यास निघा-ली. जातां जातां मार्गांत तिचें व यमाचें संभाषण झालें; त्यांत तिची पतिनिष्ठा, न्यायप्रचुरभाषण, चतुरता इत्यादि गुणांनीं यमराज संतुष्ट झाले व तिच्या सासुसासऱ्यांस

दृष्टि व राज्य दिलें, मातापितरांस पुत्रसंतान दिलें आणि तिला तिचा प्रियपति देऊन परत लावलें.

**सारांश.**–सद्गुण, सद्वर्तन, पत्यैकभाव, निर्मलवृत्ति, इत्यादि गुणांनीं युक्त सावित्री असल्यामुळें तिनें आपली कीर्ति या जगांत अमर करून ठेवली आहे, तिचें चरित्र सर्व स्त्रिया मोठ्या पूज्य बुद्धीनें गातात, आणि तिच्या सदाचरणाचें जणूं काय स्मारकच म्हणून ' वटसावित्री ' या नांवानें प्रतिवर्षी ' ज्येष्ठशुद्ध पौर्णिमेस ' आमच्यांतील सर्व सुवासिनी स्त्रिया व्रत करीत असतात. या व्रताचरणानें व्रतविषय जी सावित्री तिचे संपूर्ण सद्गुण आमच्या स्त्रीवर्गाचे ठायीं उतरून तिजप्रमाणेंच आपली जगांत सत्कीर्ति करून ठेवण्याची त्यांना बुद्धि होत जावो.

---

## सुकन्या.

:o:

शर्याती नामक कोणी एक राजा एकदां शिकारीस गेला होता. त्याच्या सैन्यानें ज्या वनांत तळ दिला होता, त्याच वनांत च्यवनभार्गव नामक एक ऋषि तपश्चर्या करीत होता. तो ऋषि समाधि लावून बहु काल एकेच ठिकाणीं निश्चल बसल्यामुळें, त्याचे सर्वांगावर वारुळ वाढून त्यानें त्याचें शरीर सर्व झांकून गेलें होतें.

एके दिवशीं शर्यातीराजाची मुलगी सुकन्या त्या वनांत मौजेनें फिरत असतां त्या वारुळापाशीं आली व त्याचे छिद्रांत कांहीं चमकल्या सारखें तिला वाटल्यावरून तिनें त्यांत

एक कांटा टोंचला; त्याबरोबर त्या ऋषीचे डोळे फुटून एकाएकी रक्त बाहेर आलें. तें पाहून सुकन्या भ्याली व मुकाट्यानें तडक राजाच्या तंबूकडे निघून गेली. इकडे नेत्राच्या वेदनेनें ऋषि देहभानावर येऊन या अनर्थाचें कारण कोण असावें हें अंतर्ज्ञानानें पाहतो तों त्यास हें शर्याती राजाच्या कन्येचें कृत्य आहे असें समजलें. तेव्हां त्यानें क्रोधानें त्या राजाच्या सैन्यांतील सर्व लोकांचा एकदम मलमूत्रावरोध केला. त्यामुळें राजासहित सर्व लोकांस पीडा होऊं लागली. त्या वनांत च्यवनभार्गवऋषि तप करीत आहेत हें त्यास माहीत असल्यामुळें त्या ऋषीचा तर कांहीं कोणी अपराध केला नाहींना असें राजाच्या मनांत येऊन त्यानें त्याजबद्दल आपल्या सर्व सैन्यांत शोध केला. तेव्हां त्यास आपल्याच कन्येकडून ही न समजून घडलेली चूक समजली. मग तो तिला हातीं घेऊन त्या ऋषीकडे गेला व त्यास साष्टांग दंडवत घालून पोरबुद्धीनें न समजतां झालेल्या आपल्या कन्येच्या अपराधाची क्षमा मागितली. त्यावर ऋषीनें सांगितलें कीं, मी आतां अंध झाल्यामुळें माझ्या तपश्चर्येस अडचण न व्हावी म्हणून तूं आपली ही सुकन्या माझ्या शुश्रुषेकरितां पत्नी करून देत असलास तर मी तिचा अपराध सहन करीन.

राजानें ऋषीचें वार्धक्य, अंधत्व व संन्याश्रम पाहून आणि आपल्या कन्येचें सौकुमार्य व ऐश्वर्योपभोगक्षमता लक्ष्यांत आणून हा संबंध कसा व्हावा ही त्यास मोठी चिंता पडली. त्या वेळीं सुकन्येनें हात जोडून बापाची विनंती केली कीं, "तुझी खुशाल या ऋषीमहाराजांचे पदरीं मला घालावें. मी

शुद्ध अंतःकरणानें यांची रात्रंदिवस सेवाचाकरी करीत आनंदानें कालक्रमणा करीन. वनामध्यें एकटी आणि असल्या दीन ऐश्वर्यांत राहिल्यानें माझ्या शीलभ्रष्टतेची आपणास कदाचित् चिंता वाटत असेल, तर आपणास मी खात्रीनें सांगतें कीं, पतिव्रताधर्मांतून माझें पाऊल यत्किंचित् सुद्धां मी ढळूं देणार नाहीं. कन्येचें हें निश्चयपूर्वक भाषण ऐकून राजानें त्या ऋषीस आपली ती सुकन्या अर्पण करून तो आपल्या नगरास चालता झाला.

इकडे त्या कन्येनें राजकीय वस्त्राभरणांचा त्याग करून ऋषिपत्नीस साजेल अशीं वल्कलांबरें धारण केलीं व मोठ्या आनंदानें आणि प्रेमपूर्वक आपल्या वृद्ध व अंध पतीची ती मनोभावें शुश्रूषा करूं लागली. अंधत्वामुळें त्यास आलेली पराधीनता हिनें सर्वस्वीं आपण संभाळून त्याच्या स्नानसंध्याजपहोमादि नित्यनैमित्तिक कर्मांत तिनें किंचित्ही व्यंग होऊं दिलें नाहीं. याप्रमाणें ती पत्यैकनिष्ठ स्त्री पतिसेवातत्पर असतां एके दिवशीं जवळच्या एका सरोवरांतून स्नान करून अश्रमांत परत येत होती, तों मार्गांत सूर्यपुत्र व प्रसिद्ध रूपवान् देवांचे वैद्य अश्विनीकुमार तिला भेटले. त्यांनीं या रूपयौवनसंपन्न सुकन्येला वनांत एकटी पाहून अभिलाषबुद्धीनें ते तिला आपला ऐश्वर्यप्रभाव सांगून अनुकूल करूं लागले. परंतु त्या पतिव्रतेनें त्यांची उलटी निर्भत्सनाच करून आपल्या धर्मन्यायप्रचुरभाषणानें त्यांसच उलटें लाजविलें. "हे सूर्यपुत्राहो, माझ्या बापानें ज्या पतीस माझें दान केलें आहे, तो कसाहि असला तरी त्याशींच सत्यनिष्ठेनें

वागण्यांत माझें कुशल आहे. अन्यथा मार्गाचें सेवन माझे हातून कदापि होणार नाहीं. लोकांच्या सदसत्कर्मांचा साक्षी जो हा भगवान् सुर्यनारायण त्याचेच तुह्मी पुत्र असून मला सन्मार्गभ्रष्ट करण्याची इच्छा बाळगतां हें तुह्मांस अगदीं उचित नाहीं. मी खऱ्या धर्मानें वागत असतांहि ज्या अर्थी तुह्मी मला असें भ्रष्ट करूं पाहतां, त्या अर्थी मजपासून कांहींतरी शापवचन घेण्याची तुह्मांस इच्छा झाल्यासारखी दिसते."

सुकन्येचें असें भाषण ऐकून **अश्विनीकुमार** निरुत्तर झाले व त्यांनीं तिची क्षमा मागून तिच्या संतोषाकरितां आपल्या वैद्यकीय सामर्थ्यानें तिच्या पतीस तारुण्य आणि दृष्टि देऊन ते मार्गस्थ झाले.

**सारांश.**—आपापल्या धर्मानें जो सत्यनिष्ठापूर्वक वर्तन ठेवतो, त्यास त्या प्रकारच्या वर्तनाचें उत्कृष्ट फल मिळाल्यावाचून खचित राहणार नाहीं. पत्येकनिष्ठा हा पतिव्रता स्त्रियांचा धर्म होय. तो कोणत्याहि विपन्नावस्थेंत सुकन्येनें सोडला नाहीं. त्यामुळें तिला शेवटीं सौख्याचीच जोड होऊन जगांत कीर्ति प्राप्त झाली. अशी कीर्ति हरएक स्त्रीनें मिळविण्याचा यत्न करणें खचित श्रेयस्कर आहे.

---

# चूडाला.

—:०:—

पूर्वीं **शिखिध्वज** नांवाचा एक राजा होता. त्याच्या पत्नीचें नांव **चूडाला**. हीं नवराबायको चांगलीं धर्मशील होतीं. दोघांनींहि एकाच सद्गुरूपासून परमार्थज्ञानाचा

उपदेश ग्रहण केला होता. या उपदेशाप्रमाणें चूडालेला आत्मस्वरूपाची ओळख तेंव्हांच पटली. त्यामुळें ती नित्य निजानंदांत निमग्न राहूं लागली. परंतु राजाला कदाचित् अनेककार्यव्याप्तृत्वामुळें मननशक्ति थोडी असल्यानें सद्गुरुमुखानें श्रवण केलेल्या ज्ञानाचा प्रत्यक्ष बोध ठसला नाहीं. इकडे परमार्थज्ञानांत चूडलेचा अधिकार दिवसानुदिवस चांगलाच वृद्धिंगत होत जाऊन तिची पूर्ण समाधानी वृत्ति बनली. सुखदुःखाच्या भावना तिला मुळींच होईनाशा झाल्या. त्यामुळें तिच्या शरीराचीही कांति पालटून ती विशेष तेजःपुंज दिसूं लागली. हा सर्व प्रकार पाहून राजास मोठा विस्मय वाटला व मनांत कांहीं वाईट शंकाहि आली. तेंव्हां एके दिवशीं रात्रीं उभयतां एकांतांत असतां त्यानें तिला जरा चाचून बोलण्याच्या इराद्यानें विचारलें कीं, "उभयतां आपण आतां उत्तरोत्तर उतार वयाचेच होत चाललों असतां तुझ्या शरीराचा रंग तर कांहीं निराळाच दिसूं लागला आहे. तेंव्हां कोणत्या अशा सुखानें तूं अलीकडे अशी टवटवीत झाली आहेस हें मला सांग बरें? "

यावर चूडालेनें हंसून उत्तर केलें कीं, "महाराज, हा सर्व त्या सद्गुरूनें केलेल्या ज्ञानोपदेशाचा प्रभाव आहे. त्यांच्याच कृपेनें जें ज्ञान मला प्राप्त झालें, त्याच्या अभ्यासानें मनुष्यास सुखदुःख देणाऱ्या हर्षविषादादि मनोवृत्ति आतां मजमध्यें अगदीं नष्ट झाल्यानें मला सदा आनंदच आहे. मनोव्याधि गेल्यानें अंतर सुखी झालें आहे आणि अंतर सुखावल्यानें शरीरास साहजिक बाह्य टवटवी आली आहे."

चूडालेच्या या भाषणाचा मतलब राजाच्या मनानें विप-

रीत घेतल्यामुळें त्याला तिचें हें बोलणें बिलकुल रुचलें नाहीं. त्यानें तिची फार निर्भर्त्सना केली. तो ह्मणाला, स्त्रिया ह्या जातीनेंच मोठ्या कपटी असतात. त्या बोलतील एक, करतील दुसरें, आणि त्यांच्या मनांत असेल तिसरेंच. तूं ब्रह्मसुखानें आनंदी आहेस ह्मणून सांगतेस तें केवळ थोतांड आहे. आमच्या सारखीच संसारांत वागत आहेस आणि असें असून हर्षविषाद हे मनोविकार तुला होत नाहींत, त्यांपासुन तूं अलिप्त झाली आहेस, हें ह्मणणें अगदीं मिथ्या आहे.

स्त्रिया ह्मणजे असत्याची केवळ रास असें मी ऐकत होतों तें आज माझ्या प्रचीतीस आलें. असें बोलून शिखिध्वज-राजा तेथून रागानें निघून गेला. इकडे चूडालेला क्षणभर असमाधान वाटलें, तें इतक्याकरितांच कीं, आह्मी उभय-तांनीं एकेच गुरूचा अनुग्रह घेतला असतां राजाचे मनांत तो ठसला नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्याचा विपरित परिणाम झाला हें कांहीं चांगलें झालें नाहीं. शेवटीं तिनें आपल्या मनाचा पक्का निश्चय केला कीं, नित्य सोईसोईनें राजास उपदेश करून आपण ताळ्यावर आणावें. मग त्या दिवसापासून ती नित्य कांहींतरी ओघानें आपल्या भाष-णांत परमार्थ विषय आणून त्याजवर ती राजास उपदेशपर व्याख्यान देत असे.असे कांहीं दिवस लोटले तरी राजाच्या मनावर तिच्या भाषणाचा कांहीं परिणाम होईना. तो ह्मणे, ही आमची दासी, हिनें काय आह्मांस बोध करावयाचा आहे! आह्मी कांहीं हिचें ऐकणार नाहीं. हिला असा काय

ज्ञानाचा कांदा हातीं लागला आहे ह्मणून ही त्यांतलें आह्मांस कांहीं देणार !

राजाची ही अशा प्रकारची अविश्वासी वृत्ति पाहून चूडालेला वाटलें कीं, याला ताळ्यावर आणण्याचा आपला निश्चय सिद्धीस जात नाहीं. पण जरी तिच्या उपदेशाचा नाहीं तरी तिच्या सद्वर्तनाचा परिणाम राजाचे मनावर झालाच. तिचें विषयविरक्त वर्तन पाहून त्याच्या मनांत कांहीं वैराग्याचे विचार येऊं लागले. एके दिवशीं तो होऊनच चूडालेला ह्मणूं लागला कीं, मला आतां या संसाराचा कंटाळा आला आहे. ही राज्यसंपदा वगैरे सर्व सोडून खुशाल अरण्यवास करावा असें वाटतें.

हें चूडालेनें ऐकून तिला फार समाधान वाटलें व आज राजाचा कांहींसा भाग्योदय होण्याचा समय आलासें वाटून ती ह्मणाली, खरेंच, पूर्वींचे राजेही असेच विरक्त होऊन तपोवनांत परमार्थप्राप्तीसाठीं जात असत. परंतु तसें केवळ वनांतच गेलें पाहिजे असें नाहीं. अंतरीं वैराग्याचें बीज पूर्णपणें जतन ठेवून बाह्य रीतीनें ह्या विषयपसाऱ्यांत खुशाल आचरण करावें. यावर राजा ह्मणाला, मला आतां बाह्यरीतीनें सुद्धां ह्या विषयपसाऱ्यांत राहणें नको; तुला तें साधत आहे तेव्हां तूंच हें राज्य संभाळ. मी तर आतां सर्वसंगपरित्याग करून अरण्यवास सेवन करणार.

चूडाला ह्मणाली, अहो विचारसाधन पूर्ण झाल्यावांचून प्रपंच त्यागिल्यानें काय होणार आहे; याकरितां असें अयुक्त करूं नका. नुसतें वनांत राहून झाडपाला भक्षण केल्यानें जर परमेश्वर प्राप्ति होते तर वनचरांना

ती सहज झाली असती. याप्रमाणें चूडालेनें पुष्कळ प्रकारें भाषण केलें. पण राजानें त्याजवर तिला मुळींच उत्तर न देतां निद्रेचें मिष केलें. चूडालेस वाटलें कीं, आपला उपदेश राजाचे मनांत रुझल्यामुळें तो निरुत्तर झाला असावा. तेव्हां त्यास जास्त त्रास न देतां तीहि झोंपी गेली. बरीच रात्र होऊन जिकडेतिकडे सामसूम झाल्यावर शिखिध्वज राजा हळूंच उठला आणि नगराबाहेर येऊन आंगाला राख फासली, जटावल्कलें परिधान केलीं आणि दूर मेरूपर्वताचे एके दरींत एक गुंफा निर्माण करून तेथें जपतपादि साधनें करीत स्वस्थ राहिला.

इकडे चूडाला सकाळीं जागी होऊन पहाते तों राजा नाहीं. दासीकडून सर्व वाडा शोधविला, नगरांत चहूंकडे सेवक पाठविले तरी राजाचा पत्ता नाहीं. तेव्हां चूडालेनें प्रधानास बोलावून रात्रींचें सर्व वर्तमान सांगितलें व राजा वनांत गेल्याची बातमी बाहेर कोठेंहि कळूं न देतां त्याचे शोधासाठीं गुप्त हेर चहूंकडे रवाना करून राज्यकारभार यथापूर्व चालवावा अशी त्यास तिनें आज्ञा केली. पृथ्वीच्या पाठीवर चहूंकडे गुप्त हेर हिंडले, परंतु त्यांना राजाचा पत्ता लागेना. शेवटीं ते निराश होउन परत आले. तेव्हां चूडालेनें आपल्या मनाशीं विचार केला कीं, आपण स्वतः जावें तर स्त्रीजातित्वामुळें आपलें स्वतंत्र फिरणें निर्भय नाहीं; तेव्हां कांहीं तरी सिद्धि अनुकूल करून घेऊन तिच्या साह्यानें पतिशुद्धि केली पाहिजे. असा विचार करून तिनें योगाभ्यासास प्रारंभ केला व त्यांत लौकरच प्रवीणता संपादन करून प्रधानास आज्ञा केली कीं, मी आपल्या महालां-

त जाऊन बसत्यें, तिकडे कोणी येऊं नये. मी हाका मारीन त्या वेळीं मात्र यावें, तोंपर्यंत आपण स्वतः राज्य कारभार चालवावा. याप्रमाणें आज्ञा करून ती आपल्या महालांत जाऊन बसली. व योगधारणेनें आत्मा शरीराबाहेर काढून त्या अदृश्य रूपानें अंतरिक्ष मार्गें ती पतीचा शोध करीत निघाली. स्वर्ग, मृत्यु, पाताळ तिन्ही लोक तिनें पाहिले, परंतु राजाचा शोध तिला लागेना; शेवटीं एके जागीं निश्चल होऊन ज्ञानदृष्टीनें जेव्हां पाहूं लागली, तेव्हां तिला आपला पति मेरूपर्वताचे एका दरींत ऋषीश्वरांच्या मंडळींत जपतपांत निमग्न असलेला आढळला. त्याचा तो वन्याश्रम पाहून चूडालेस परम समाधान वाटलें व आणखीहि यास आतां असेंच कांहीं दिवस राहूं दिलें असतां परमार्थज्ञानोपदेश पूर्णपणें ठसण्याजोगा याचा अधिकार सहज होईल असें जाणून ती परत आपल्या नगरीं गेली. नंतर महालाबाहेर येऊन कांहीं काळपर्यंत तिनें स्वतः राज्यकारभार चालविला. नंतर पूर्वींप्रमाणें पुनः प्रधानास आज्ञा करून आपण गुप्तरूपानें शिखिध्वजाचे आश्रमास आली. नंतर तिनें असा विचार केला कीं, स्त्रीरूपानें जर मी आतां यास भेटलें तर पुनः हा पूर्वीप्रमाणेंच माझी हेळणा करील. स्त्रीमुखांतून निघालेल्या शद्बांवर याचा विश्वास मुळींच बसावयाचा नाहीं. याकरितां आतां आपण पुरुषवेष धारण करावा.

इकडे राजाचा अधिकार जसजसा वाढत चालला तसतसें नुसत्या जपतपादि कर्मांत त्याला पाहिजे तसें समाधान वाटेनासें झालें. तेव्हां अर्थात गुरुज्ञानोपदेशाची तृष्णा

त्याला उद्धरून कोणी तरी गुरु करावा अशी तो इच्छा करूं लागला. त्याचवेळीं त्याला आपल्या पूर्वगुरूचें व त्याचप्रमाणें चूडाला सांगत होती त्या हितबोधाचेंहि स्मरण होऊन, तें आपण न ऐकतां उगीच हा देह कष्टविणारा अरण्यवास सेवन केला ह्मणून त्यास पश्चात्ताप झाला. इतक्यांत चूडाला पुरुषवेषानें त्याच्या गुहेंत प्रवेश करून त्याचेसन्मुख अंतरिक्षांत उभी राहिली. तिचा तो तेजःपुंज देह पाहून राजास आपल्या इच्छेप्रमाणें आपणास हा गुरुच प्राप्त झाला, असें वाटून त्यानें त्या पुरुषवेषधारी चूडालेचें अभ्युत्थानपूर्वक आगतस्वागत केलें आणि आपली इच्छा निवेदन केली.

चूडालेनें आपलें नांव कुंभक असें सांगून आपण नारदपुत्र आहों असें ती ह्मणाली. आणि तुझ्यासारखा अधिकारी मिळाल्यावर त्यास ज्ञानोपदेश करणें हें आमचें कर्तव्यच आहे असें सांगून त्याजवर अनुग्रह करण्याचें तिनें अभिवचन दिलें; नंतर नित्य अनेक युक्तिप्रयुक्तींनीं राजाच्या एकेक शंका फेडीत त्यास तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याचा क्रम सुरू केला. होतां होतां शेवटीं सर्व शंकांची निवृत्ति होऊन ज्ञानोपदेश ज्या दिवशीं पूर्णपणें त्याच्या ठायीं बिंबला त्या दिवशीं एकदम त्याची समाधि लागली; आणि हें पाहून चूडालेला अत्यंत कृतकृत्यता वाटली. पुढें चूडालेनें राजाची ही समाधि बळेंच उतरवून त्याला तिचा दृढ अभ्यास होण्याची पद्धत सांगितली आणि याप्रमाणें या मार्गांत तो पूर्ण झाल्यावर अनेक प्रकारें लोभाच्या गोष्टी दाखवून तिनें तो आपल्या

वृत्तीवरून ढळतो किंवा काय याची परीक्षा पाहिली. शेवटीं तो तिच्या कसोटीस पूर्णपणें उतरलासें पाहून त्यास तिनें आपलें दर्शन दिलें.

चूडालेला पाहतांच राजाला परम आश्चर्य वाटलें व दोघांनीं एकमेकांस कडकडून आलिंगन दिलें. राजा तर तिला कडेवर घेऊन हर्षातिशयानें नाचूं लागला ! शेवटीं उभयतां मोठ्या थाटानें व आपल्या राजैश्वर्यानें नगरीस परत येऊन सुखसमाधानानें राज्याराम करूं लागले !

**सारांश.**—आजपर्यंत परमार्थदृष्टीनें विचार करणाऱ्या सर्व साधुजनांनीं स्त्रियांना अगदीं मोक्षप्राप्तीच्या मार्गांत विघ्न करणाऱ्या ठरवून टाकल्या आहेत; पण चूडालेनें त्यांच्या त्या वचनास चांगली हरताळ लावून, स्वतः स्त्री असून ही आपल्या पतीस मोक्षमार्ग सुलभ करून देऊन त्याजसह जीवन्मुक्त स्थितींत अत्यंत समाधानानें राज्यसुख अनुभवीत राहिली ! अशी स्त्री किती धन्य मानावी !

---

# विदुलेचा पुत्रास उपदेश.

विदुला नामक कोणी एक राजपत्नी होती. एके वेळीं तिचा पुत्र, संजय, युद्धास गेला असतां सिंधु देशच्या राजानें त्याचा पराजय केल्यामुळें तो युद्धांतून घरीं पळून आला. हें विदुलेनें पाहून त्यास पुनः युद्धोत्सुक करण्यासाठीं त्याच्या रणभीरु वर्तनाबद्दल निर्भर्त्सनापूर्वक त्याशीं तिनें भाषण केलें आहे तें असें—

विदुला०—संजया, आज तूं आपला दुर्लौकिक करून युद्धांतून परत आलास त्या अर्थीं तूं माझा पुत्रच नाहींस. आपल्या शत्रूस ज्यानें आनंदित केलें तो आमच्या वंशांत खचित उत्पन्न झाला नाहीं. अरे, ज्याला कोप नाहीं तो पुरुष कसला. त्याला क्लीबच ह्मटलें पाहिजे. शत्रूस हर्ष व बंधुजनांस शोक उत्पन्न करून तूं स्वस्थ येऊन येथें पडलास त्या तुला धिःकार असो. ऊठ, कंबर बांध आणि शत्रूवर चालून जा. त्यांचीं छिद्रें पाहून त्यांजवर घाव घाल. इतकें होत नसेल तर घरीं येऊन असा प्रेतवत् पडण्यापेक्षां समरांगणीं जाऊन मर. भित्रा किंवा नाजुक असा पुत्र राजवंशांत बिलकुल उपयोगाचा नाहीं. युद्धांत जय मिळो कीं न मिळो, जय मिळाल्यास ऐहिक राजवैभव तुला प्राप्त होईल न मिळाल्यास मृत्यु येऊन स्वर्गीं सुखोपभोग मिळतील. क्षात्रधर्माचें पालन करण्याकरितां जे खरे क्षत्रिय आहेत ते प्राणाची किंचित्‌हि काळजी न बाळगतां पराक्रमानें जय मिळवितात नाहीं तर मरून जातात. तुझ्यासारखे शत्रूला भिऊन नम्र होत नाहींत. तूं पराक्रम न करतां असाच स्वस्थ पडून राहिलास तर स्वकीय सुखोपभोगासाठीं जीं साधनें तूं करून ठेविलीं आहेस, किंवा कांहीं धर्मकृत्यांनीं जी कीर्ति मिळविली आहेस ती तुझे शत्रु तेव्हांच नष्ट करून टाकतील; आणि असें झालें असतां मग तूं वांचून तरी काय उपयोग आहे? अरे, मनुष्यानें असा गुण धारण करावा कीं, ज्या योगानें त्याच्या बंधुवर्गास सौख्यानंद होईल. पण आपल्या कुळाची कीर्ति आपल्या अमंगळ कृत्यांनीं नाश करणाऱ्या अशा मनुष्याचें जिणें काय

कामाचें? ऊठ, उत्साह धारण कर, आणि शत्रूस भयशोक उत्पन्न करण्यास कारण हो. आपल्या शत्रूचीं शिरें निरंतर तुडविण्याचा यत्न करणें हाच क्षत्रियांचा पुरुषार्थ आहे. तर हा भीरुपणा टाकून दे, लोखंडासारखें हृदय कठीण कर, आणि आपली नष्ट कीर्ति पुनः संपादन कर.

**संजय**–आई, मी युद्धांत जर मरण पावलों, तर मग तुला माझ्यामागें जरी साऱ्या पृथ्वीचें राज्य मिळालें, तरी त्याचा उपयोग काय बरें?

**विदुला**–अरे, रणांत जो पडतो तो स्वर्गीं उत्तम लोकाला जातो. क्षत्रिय आहेस, तर रणभीरु, परपिंडोपजीवी, निर्बल, आणि सेवकजनविहीन अशी तुझी नीच वृत्ति बिलकुल नसावी. तुझ्या शौर्यानें गोब्राह्मणांचा त्याचप्रमाणें आप्त सुहृज्जनांचा प्रतिपाळ होवो. आपल्याच बाहुबळानें आपल्या बंधुवर्गास सौख्य द्यावें व आपलें उपजीवन करावें हाच मार्ग मनुष्यास श्रेयस्कर व प्रशस्त आहे. तूं आपलें पौरुष जर घालवशील तर खचित अधोगतीसच जाशील. नीतिशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, जो क्षत्रिय आपल्या पराक्रमाची ख्याति करीत नाहीं त्यास चोर ह्मणावें! अरे माझें ऐक; असा भीतिव्यसनग्रस्त होऊन बसूं नकोस. साह्य मिळीव, संपत्ति मिळीव, आणि आपला पराक्रम गाजीव. शत्रूस भयग्रस्त करून सोड व त्यांना रानोरान पळावयास लाव. अरे, हा देह कांहीं अजरामर नाहीं! कधींतरी त्यास मृत्यु येणार आहेच. मग त्याची इतकी प्रतिष्ठा पाहिजे कशाला! संजय हें तुझें नांव आहे; त्या नांवाची तरी कांहीं लाज धर. युद्धास आ-

पणास जय कीं अपजय होणार याची आधीं चिंता बिलकुल उपयोगी नाहीं. एकदम युद्धास सिद्ध व्हावें. मला आज अन्न मिळालें, असेंच उद्यांहि कसें मिळेल याप्रमाणें जो पुरुष नेहमीं चिंता करीत बसतो त्यास धिःकार असो! मी मोठ्या कुलांत उत्पन्न झालें आहे आणि माझ्या पतीचें हें कुल मोठेंच आहे. आजपर्यंत मी आपल्या पतीच्या जीवावर जे राजकीय ऐश्वर्योपभोग भोगीत आहे ते आतां केवळ तुझ्या भीरुपणानें गमावून मी दीन दुबळ्यासारखी त्यांच्यामागें कशी जीवंत राहूं हें सांग बरें! भर्ता नाहीं, पुत्र नाहीं, कोणी नाहीं, असें समजून जेणेंकरून शरीर क्षीण होत जाईल अशाच अवस्थेत आतां ह्यापुढें मी जाऊन पडावें काय? ज्या माझ्या आश्रयानें आजपर्यंत असंख्य गरीबगुरीब सुख पावत आहेत तीं मीच आतां शत्रूच्या आश्रयास पडून राहण्याचा प्रसंग आलेला पाहून कशी वांचूं तें सांग बरें! आह्मांवरील हा प्रसंग टाळून आह्मांस स्वतंत्र करण्यास तूंच योग्य आहेस. आमचा सर्वस्वी काय तो आधार तूं. तुझीच आह्मांला आशा. तुझ्याशिवाय आह्मी कोणाच्या तोंडाकडे पहावें? अरे, युद्धांत शत्रूच्या स्वाधीन होऊन सर्वस्वीं परतंत्रतेंत नीच अशा दासवृत्तीनें उपजीवन करणारा पुरुष आपल्याकुलांत आजपर्यंत एकहि झाला नाहीं. याकरितां हा कलंक तूंच लावून घेण्यास कां पात्र होतोस?

संजय—आई, तुझा मी एकुलता एक पुत्र ना ग? असें असून मजबद्दल कांहींच माया तुझ्या हृदयांत नाहीं. काय? कठीण हृदय करून मला युद्धास जा असें कसें बरें

ह्मणतेस ? तुझ्यानें हे शब्द उच्चारवले जातात तरी कसे ?

विदुला—पुत्रा, मनुष्यास कोणतीहि अवस्था प्राप्त झाली तरी त्यानें धर्म आणि अर्थ हीं संपादन करणें कदापि सोडूं नये. क्षत्रियांना युद्धोपजीवन हाच धर्म आहे. आणि सांप्रत तर युद्धकालहि प्राप्त झाला आहे. शिवाय कालानुरूप अनुसरणें हा संभावितांचाहि धर्मच आहे. याकरितांच मी तुला युद्धार्थ प्रोत्सहन देत आहे. लोकांमध्यें असें एक अज्ञान आहे कीं, या पंचमहाभौतिक देहावरच आत्मबुद्धि ठेवून फक्त ह्या देहास जेवढ्या गोष्टी प्रिय तेवढ्याच करण्याची ते इच्छा करतात. पण मनुष्याचें वास्तविक कर्तव्य कांहीं तेंच नव्हे. तूं माझा जर पुत्र ह्मणवितोस तर पुत्रधर्माप्रमाणें मला जें प्रिय तें तूं केलेंच पाहिजेस. पुत्र अशालाच ह्मणावें कीं, ज्याची स्वधर्मावर पूर्ण श्रद्धा आहे, देव किंवा मनुष्य यांनीं करण्यास योग्य जीं कर्में तींच जो सदोदित करतो, थोरजनांनीं जे मार्ग घालून दिले आहेत त्यांनींच जो जातो व गुरुजनांविषयीं जो नम्रबुद्धि आणि आज्ञाधारकता बाळगतो अशाच पुत्रापासून सुखाची प्राप्ति होणार आहे. तूं क्षत्रिय आहेस, तेव्हां मोक्षाची इच्छा तुला युद्धकर्मानेंच केली पाहिजे.

संजय—आई, नकोग अशी निर्दय होऊन मला युद्धास जाण्याची बुद्धि शिकवूंस.

विदुला—पुत्रा, हा भीरुपणा खचित कल्याणकारक नव्हे. तूं आपल्या शत्रूशीं शूरपणानें संग्राम करशील तरच मला तूं प्रिय वाटशील, फार काय पण मग मी तुझी नित्य नेमानें पूजा देखील करीन!

संजय–आई, जाऊंच तर मी युद्धास? पण आई, मज-जवळ आतां युद्धसामुग्री तरी काय राहिली आहे बरें? शस्त्रें नाहींत, द्रव्य नाहीं, कोणी मित्र साह्य नाहींत कांहीं नाहीं. अशा स्थितींत युद्धांत मला यश मिळेल ही आशा तरी कशाला पाहिजे?

विदुला–अरे बाळा, कालगतीनें आपण कोणत्याहि स्थितींत आलों असलों तरी त्याचा खेद कशाला बाळगावा? उद्योग कर. कर्तव्यतत्पर हो. सूर्य जसा पूर्व दिशेस उदय पावतांच अंधकाराचा आपोआप नाश होतो, त्याप्रमाणें पुरुष उद्योगनिष्ठ झाला कीं, विघ्नरूप त्याचे शत्रु तत्काळ सहज नष्ट होतात. याकरितां तूं युद्धास उद्युक्त हो म्हणजे तुला वाटत असलेल्या अडचणी निवारण करण्याचे उपाय सहज सुचूं लागतील, साह्य मिळेल, कर्तव्य काय, अकर्तव्य काय यांचे विचार तुझ्या ध्यानांत येऊं लागतील व अशा रीतीनें तूं वागलास म्हणजे जयसिद्धि ही तुला कशी ठेवलेलीच आहे असें समज. अरे, राजास कशी जरी आपत्ति प्राप्त झाली तरी त्यानें भयभीत होऊं नये. तूं धैर्य धरलेंस कीं, सर्व प्रजाजन तुला साह्य होतील. याकरितां ऊठ; शत्रूवर चालून जा; आणि विजयी हो.

संजय–आई, ज्यापेक्षां तुझी अशी इच्छाच आहे आणि आज्ञाहि पण आहे, त्यापेक्षां हा पहा मी युद्धास तयार झालों. तुझ्या आशीर्वादानें शत्रूस जिंकून आपल्या वाडवडिलांचें गतराज्यवैभव पुनः संपादन करीन, नाहींतर हेंच तुझें दर्शन. पुनः तुला मी तोंड दाखविणार नाहीं.

सारांश.–आईच्या अशा युद्धप्रोत्साहनपूर्वक वीरश्रीयुक्त

भाषणानें संजयाला शौर्यस्फूर्ति होऊन त्यानें आपल्या पित्याचें गतराज्य शत्रूपासून परत घेतलें व मातेस संतोषित केलें. महाभारतांत ह्या कथेस "उद्धर्षण आख्यान" असें ह्मटलें आहे. हें गर्भिणीस्त्रियांनीं श्रवण केल्यास त्यांस वीर्यवान् पुत्र होतो अशी याची फलश्रुति सांगितली आहे. प्राचीन काळीं आमच्या राजस्त्रिया केवळ भोगांगनाच नव्हत्या हें या संवादावरून ध्यानांत येईल.

---

# शकुंतलेचें राजसभेंत भाषण.

शकुंतलेशीं गंधर्व विवाह करून दुष्यंतराजा परत आपले नगरीस आल्यावर तिला दिलेल्या वचनाचें त्यास विस्मरण झालें. इकडे कण्वऋषींनीं बरेच दिवस वाट पाहिल्यावर:—

होका उत्तमाची कुमारी ॥ बहुकाळ वर्ततां माहेरीं ॥
उद्धता होय विहिताचारी ॥ लोकनिंदा करितातीं ॥१॥
शिखा स्वस्थानीं साजिरी ॥ भर्तृगृहीं पवित्र नारी ॥
शोभा श्लाघ्य मान्यता थोरी॥उभय लोकीं ते पावे॥२॥

असा विचार त्यांचे मनांत येऊन त्यांनीं आपला शिष्यवर्ग बरोबर देऊन शकुंतलेची रवानगी तिच्या पांच वर्षांच्या भरत नामक पुत्रासहवर्तमान करून दिली. दुष्यंतराजा दरबारांत बसला असतां त्याजपुढें शकुंतला येऊन तिनें विनयपूर्वक पूर्वस्मरण राजास दिलें: परंतु एकदम मी हिचा अंगिकार कसा करूं, वनांत हिच्याशीं घडलेला शास्त्रोक्त

लोकमान्य कसा होईल या भयानें, राजानें आपल्याला जणुं काय कांहींच माहिती नाहीं, अशा प्रकारें तिच्या नम्रतापूर्वक प्रार्थनेची उडवाउडव केली; इतकेंच नव्हे तर, तिला तो दुर्विशेषणेंहि लावूं लागला. तेव्हां तिला संताप येऊन तिनें न्यायप्रचुर फार सुरेख भाषण केलें व तिच्या भाषणाचें पर्यवसान होत आहे. इतक्यांत आकाशवाणी झाली. तेव्हां राजदरबारांतील लोकांची आयतीच खात्री झाल्यामुळें राजानें शकुंतलेची क्षमा मागून तिचा तत्काळ अंगीकार केला.* आह्मी या ठिकाणीं तिच्या त्या राजदरबारांतील भाषणाचा थोडासा भाग घेतला आहे. त्यावरून शकुंतलेची योग्यता वाचकांना समजण्यासारखी आहे.

"महाराज, आपणास माझी सर्वोपरीं माहिती असतां बळेंच हें अज्ञानाचें पांघरूण कां बरें घेतां ? प्रत्यक्ष अथवा गुप्त अशा सर्व पापपुण्याचा साक्षी, भगवान, सर्वांच्या अंतर्यामीं वास करीत आहे, त्याचेसमक्ष आपल्या मुखांतून अशीं पापाक्षरें कशीं बरें निघतात ? मी आपली खरी भार्या आहे; आणि त्याच नात्यानें मी आपल्यासन्निध आल्यें आहे. माझी उपेक्षा करूं नका. आपल्या कठोर भाषणांनीं माझें हृदय शोकाकुल होत आहे त्याची तुह्माला दया कांहींच कां येत नाहीं ? मी आपली भार्या आहे,

* महाभारतांत "दुष्यंतशकुंतलाख्यान" आहे त्यांत आह्मी वरतीं दिली आहे त्याप्रमाणें कथा आहे. त्या कथेचा आधार घेऊन कालिदासानें जें "शाकुंतल नाटक" रचलें आहे, त्यांत कथासौंदर्यास्तव वरील गोष्टींत जो फरक केला आहे तो सर्वांस माहीत आहेच.

तेव्हां सभेंत उघड रीतीनें असा अपमान करून घेण्यास मी पात्र नाहीं. जी स्त्री गृहकार्यांत दक्ष, जिला कन्या पुत्र होताहेत, जिची पतिनिष्ठा स्वकीय प्राणाहूनसुद्धां श्रेष्ठ आहे, व पातिव्रत्य हाच जिचा धर्म आहे त्या स्त्रियेला भार्या असें ह्मणावें. अशी जी भार्या ती पुरुषाचें अर्धे शरीर होय. धर्म •अर्थादिकांचें मूळ तीच आहे. ती ज्यास लाभली आहे तोच गृहस्थाश्रमी मनुष्य सुखी होय. व लक्ष्मीसुद्धां त्याच ठिकाणीं वास करते. मनुष्यास कितीही विपन्नावस्था प्राप्त होवो, त्याला तशा स्थितींत भार्या हीच उत्तम मित्र आहे. त्याप्रमाणें त्याचें कुमार्गापासून परावर्तन करण्यासमुद्धां भार्याच समर्थ आहे. शारीर मानसिक व्याधीनें अंतःकरण कितीहि उदास झालें असलें तरी भार्यादर्शनानें तें तत्काल. प्रसन्न होतें. आपल्या क्रोधाचें शांत्वन भार्याच करते.

सुशील भार्या, सद्गुणी पुत्र, अचल लक्ष्मी आणि निरोगी काया हीं सर्व प्राप्त होण्यास खरोखर संचित पुण्य बळवत्तर पाहिजे. राजा, हीं सर्व तुझ्या घरीं आपण होऊन चालत आलीं असतां त्यांना पायानें लोटून अभागी कां होतोस? ह्या पुत्राकडे तरी पहा. मुंगीसुद्धां आपल्या अंड्यांचें पोषण करते; तेव्हां आपण धर्मनीतिज्ञ असतां आपल्या पुत्राचा आणि भार्येचा त्याग कां बरें करतां? ज्याप्रमाणें मानव जातींत ब्राह्मण श्रेष्ठ, पश्वादिकांत धेनु श्रेष्ठ आणि मंत्रिजनांत गुरु श्रेष्ठ मानला आहे, त्याचप्रमाणें सर्व स्पर्श्य पदार्थांत आपला पुत्र हा श्रेष्ठ मानला आहे; पुत्रावांचून पितरांस गति नाहीं. पुत्राचें जनन होतें

त्या वेळीं जातकसंस्कार होतांना बाप ह्मणत असतो कीं, " हे पुत्रा, माझ्या हृदयापासून तुझी उत्पत्ति आहे; तूं माझें प्रतिबिंब आहेस; तूं शतायुष्मान हो;" राजा, आपणास मी हें शास्त्रार्थ सांगावें असें नाहीं. पण आपण मुद्दाम विस्मरण झाल्यासारखें करतां आहां ह्मणून मी हें बोललें.

जो पुरुष आपल्या पुत्राची योग्यता आपल्या बरोबरीनें ठेवीत नाहीं त्याची लक्ष्मी नष्ट होते, व परलोकगतिही त्याला दुष्प्राप्य होते. सर्व रत्नांत पुत्र रत्न हेंच श्रेष्ठ आहे, यास्तव त्याची उपेक्षा करूं नये. विवाहित पत्नीपासून झालेला, मिळालेला, विकत घेतलेला, उपनयनादि संस्कार आपण केलेला आणि ज्यास आपण लहानपणापासून वाढविलें आहे तो, असे पांच प्रकारचे पुत्र होत, असें शास्त्रांत सांगितलें आहे. महाराज, आपण मोठे सद्धर्मनिष्ठ व न्यायी आहांत. कपटभाषण करून आपण आपल्या विवाहित धर्मपत्नीचा व पुत्राचा धिःकारपूर्वक त्याग करणें हें आपणास उचित नाहीं. अहो, असत्यरूपी पर्वताचे तळीं उभें राहणें निर्भय नाहीं. याकरितां सत्यमार्गाचें अवलंबन करा. सहस्र अश्वमेध केल्यानेंहि जें पुण्य प्राप्त व्हावयाचें नाहीं तें एक सत्यनिष्ठेनें प्राप्त होणारें आहे; शेवटीं या दासीची इतकीच विनंति आहे कीं,

सत्यापरता नाहीं धर्म ॥ सत्य तेंचि परब्रह्म ॥
सत्यापाशीं पुरुषोत्तम ॥ सर्व काळीं तिष्ठत ॥ १ ॥
असत्य तेंचि पैं पातक ॥ असत्य तोचि महानरक ॥
असत्याचेनि संगें दुःख ॥ अनंतजन्म भोगिती ॥२॥

सत्यामृताची कनकवाटी ॥ जोडली न सांडावी भूतटीं ॥
असत्यविषाची करोटी ॥ पवित्र हातें नातळे ॥ ३ ॥

जनापवाद न यावा ह्मणून राजानें तिचा तिरस्कार केला होता, पण इतकें तिचें भाषण होत आहे. इतक्यांत आकाशवाणी झाल्यानें शकुंतलेचा राजानें अंगिकार केला.

## सत्यभामेचें पतिदानव्रत.

श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांमध्यें **सत्यभामा** ही फारच हावऱ्या स्वभावाची बायको होती. तिजवर **श्रीकृष्ण** अतिशय प्रीति करी, व तिचें नाहीं नाहीं तें कोड पुरवी, तरीसुद्धां तिची कधीं समाधानवृत्ति नसे. एकदां सहज **नारदऋषींची** स्वारी भ्रमण करतां करतां तिचे मंदिरांत. आली. स्वागत व पूजन झाल्यावर **सत्यभामेनें** विचारलें कीं, **नारदमुने**, जेणेंकरून **श्रीकृष्ण** मला जन्मोजन्मीं **पति** मिळेल असें एखादें व्रत कांहीं असल्यास सांगावें. **सत्यभामेच्या** या प्रश्नाचें **नारदास** हंसूं तर आलेंच; पण घटकाभर मौज करण्याच्या उद्देशानें ते तिला ह्मणाले कीं, होय, असें एक व्रत आहे खरें; हें बघ, आपणास जी वस्तु पुढचे जन्मीं पाहिजे असते, तिचें एथें दान करावें ह्मणजे झालें. तर तूं एखादा उत्तम ब्राह्मण पाहून श्रीकृष्णाचें दान कर, ह्मणजे तुझ्या इच्छेप्रमाणें फलप्राप्ति तुला होईल.

हें **नारदाचें** भाषण ऐकून **सत्यभामेस** फारच आनंद झाला. मग **नारदासारखाच सत्पात्र ब्राह्मण**

हें दान घेण्यास योग्य आहे असा विचार मनांत आणून तिनें त्याजबद्दल त्यांचीच प्रार्थना केली. नारदाला ही गंमत आपल्याच देखतां होते आहे हें बरेंच, असें वाटून त्यानें रुकार दिला. सत्यभामेनें दासीकरवीं पूजासाहित्य करवून श्रीकृष्णास बोलावून आणलें आणि आपली इच्छा व नारदाचा उपदेश कळवून दानाची सिद्धता केली. श्रीकृष्ण हाहि विनोदीच स्वभावाचा! त्यानें सत्यभामेच्या हौसेस रुकार देऊन तिच्या हातानें आपला दानसंस्कार करवून घेतला. इतक्यांत ही बातमी सर्व द्वारकेंत पसरली.

श्रीकृष्णाच्या सोळा हजार स्त्रियांनीं ती ऐकतांच सत्यभामेच्या महालाभोंवतीं सर्वजणी येऊन उभ्या राहिल्या. आणि श्रीकृष्णाचें दान करण्याचा अधिकार तुला एकटीलाच कोठून आला, तूं त्याचें दान कसें केलेंस, वगैरे अनेक प्रकारें त्यांनीं सत्यभामेला अगदीं बोलबोलून घेतलें. तिनें नारदाकडे बोट दाखविलें. पण तो ह्मणाला, "आपल्याला काय बोवा! हिनें व्रत विचारलें, मी खरें होतें तें सांगितलें; तेव्हां श्रीकृष्ण मलाच दान द्या ह्मणून ही ह्मणाली. मी ह्मटलें, बरेंच झालें आपल्याला झोळी व विणा संभाळायला तरी होईल, ह्मणून मीं तें दान घेतलें. आतां दिलेलें दान तुह्मी परत घेऊन पापांत पडत असलां तर पडा बापड्या! माझें कांहीं जात नाहीं!!"

हें नारदाचें लाघवी बोलणें ऐकून मग तर त्या अतिशयच संतापल्या आणि सर्वजणींनीं त्या ठिकाणीं एकच आकांत केला. इकडे सत्यभामा तर इतकी ओशाळली कीं, तिला आपलें तोंडसुद्धां दाखविण्यास लाज वाटूं लागली. मग

श्रीकृष्णानें खुण केल्यावरून नारदानें एक तोड काढली कीं, या कृष्णाचे भारंभार जर सर्वजणीं मला सानें देत असाल, तर मी तुमचा कृष्ण तुम्हांस परत देतों. हें ऐकतांच सर्वजणींस एकदम हर्ष होऊन आपला पति परत मिळण्याकरितां आंगावरील किडुकमिडुकसुद्धां सर्व दागिने भराभर काढून त्यांनीं नारदापुढें ठेवले.

नंतर एक मोठा तराजु आणून एका पारड्यांत श्रीकृष्णास बसविलें व दुसऱ्या पारड्यांत दागिने भरण्यास सुरवात केली. आपल्या वरचा बोल टाळावा ह्मणून सर्वांच्यापूर्वीं सत्यभामेनें आपल्या महलांत होतें नव्हतें तेव्हढें सर्व सोनें आणून पारड्यांत भरलें. नंतर एकामागून एक ह्याप्रमाणें श्रीकृष्णाच्या सर्व स्त्रियांनीं आंगावर एक फुटका मणीहि न ठेवतां दागिने पारड्यांत भरले, पण श्रीकृष्णाचें पारडें कांहीं उचलेना! शेवटीं सर्वजणी अगदीं हताश झालेल्या पाहून श्रीकृष्णानें रुक्मिणीला घेऊन येण्याची आज्ञा केली.

रुक्मिणी ह्या वेळीं तुळशीवृंदावनापाशीं बसून पूजाअर्चा करीत होती. दासीच्या मुखानें सर्व वृत्तांत ऐकून तिनें फक्त एक तुळशीपत्र तोडून घेतलें आणि हा श्रीकृष्णतुलनेचा समारंभ चालला होता त्या ठिकाणीं आली. तेथें येऊन तिनें त्या पारड्यांत तें तुळशीपत्र टाकतांच दागिन्यांचें पारडें खालीं बसलें व श्रीकृष्णाचें पारडें वर गेलें. नंतर ती तुलना बरोबर होण्याकरितां एकेक दागिना काढून घेतां घेतां सर्व दागिने ज्यांचे त्यांस काढून देऊन, फक्त तुळशी पत्रावर श्रीकृष्णाची तुलना होऊन तें तिनें नारदास अर्पण केलें व नमस्कार करून आपल्या पतीस सोडविलें

हें पाहून सत्यभामेसह सर्व स्त्रिया आपापली योग्यता काय आहे हें मनांतल्या मनांत तर्कून आपल्या महालांत परत गेल्या आणि नारदास सन्मानपूर्वक वाटेस लावून श्रीकृष्ण रुक्मिणीसह वर्तमान तिच्या मंदिरांत निघून गेले.

---

# लक्ष्मीगर्वपरिहार.

एकदां पार्वती सहज वैकुंठास गेली होती. त्यावेळीं लक्ष्मीनें तिचें आगतस्वागत केलें, परंतु आपल्या ऐश्वर्यवैभवाच्या तोऱ्यानें तिची जरा अवगणना करून तिनें तिच्या पतीच्या भिक्षुवृत्तिचा, स्मशानवासित्वाचा व दिगंबरपणाचा पुष्कळ उपहास केला. आपला पति भिकारी ह्मणून लक्ष्मीनें आपला असा उपहास केला; हें मनांत येऊन पार्वतीला पुष्कळ वाईट वाटलें व परत आल्यावर तिनें तो सर्व वृत्तांत श्रीशंकरास सांगितला. तेव्हां तिचें समाधान करण्याच्या उद्देशानें ते तिला ह्मणाले कीं, कांहीं हरकत नाहीं, तुला पाहिजेत का दागदागिने? तर जा कुबेराकडे आणि वाटेल तशी दागदागिन्यांनीं मढून ये कशी? हा घे एक केंस असें ह्मणून आपल्या जटेचा एक केंस शंकरांनीं तिच्या हातीं दिला, आणि याचे भारंभार लागतील तितके दागिने घेऊन ये ह्मणून सांगितलें.

पार्वतीला प्रथम ही थट्टाच वाटली, परंतु पतीच्या शब्दावर विश्वासून तिनें तो केंस घेतला आणि कुबेरनगरीस गेली. कुबेरापाशीं केंसाच्या भारंभार सुवर्णालं-

कार मागतां त्यालाही आश्चर्य वाटलें. पण शंकराची आज्ञा, तेव्हां मुकाट्यानें त्यानें तो केंस लहानशा ताजव्यांत घालून गुंजभर सोनें वजन करूं लागला. परंतु गुंज तर काय पण दहातोळे सोनें टाकून पाहिलें तरी केंसाशीं तें भारंभार होईना, तेव्हां त्यानें जरा मोठा तराजू घेऊन त्यानें वजन करूं लागला. दहा वीस शेर सोनें घालून पाहिलें तरी केंसाची तुलना होईना. तेव्हां त्याला ज्यास्तच विस्मय वाटून त्यानें मोठ्या काट्यांत खंडी दोन खंडी सोनें भरलें व त्या केंसाचें वजन करूं लागला. तरी देखील केंसाचें पारडें हलेना ! सारांश, त्यानें आपलें नवनिधि भांडार त्या पारड्यांत ओतलें, परंतु केंसाची तुलना नाहीं. शेवटीं सत्यलोक, इंद्रलोक, यमलोक, मृत्युलोक पाताळलोक, सर्व ठिकाणें धुंडाळून आणलीं. फारतर काय, पण खुद्द वैकुंठलोकसुद्धां धुऊन आणला. तरी केंसाचें भारंभार सुवर्ण होईना. तेव्हां मात्र कुबेरानें बद्धांजुलि करून पार्वतीची प्रार्थना केली व ह्या केंसाची तुलना आपल्याच्यानें होत नाहीं ह्मणून क्षमा मागितली.

पार्वती तशीच निघाली ती कैलासास परत आली. शंकरास वाटलें कीं एका केंसानें हिचें समाधान झालें नाहीं ह्मणूनच ही रिकाम्या हातानें परत आली, ह्मणून त्यांनीं आणखी एक केंस पाहिजे कीं काय, असें विचारून जटेस हात घातला. तेव्हां पार्वती हास्यमुख करून पतीचे मांडीवर जाऊन बसली आणि त्याचे गळ्यांत हात घालून ह्मणाली कीं, आपण मला आहांत हेंच सर्व रत्नालंकारांच्या ठिकाणीं आहां. ज्यांच्या एका केंसाच्या पासंगालासुद्धां वैकुंठ

आदिकरून सर्व त्रैलोक्यांतील सुवर्णरत्नभांडारें पुरत नाहींत असे पति मला असतां मग मला काय ग बाई कमी आहे !

---

# रुक्मिणीची पत्रिका.

रुक्मिणी उपवर झाल्यानंतर एके दिवशीं आपला बाप, भीमकराजा, याचे शेजारीं बसली असतां एका ब्राह्मणाचे मुखानें श्रीकृष्णाचें गुणवर्णन तिनें ऐकलें. तें ऐकल्यावर त्या दिवसापासून तिनें आपल्या मनाचा असा निश्चय करून ठेवला कीं, विवाह करावयाचा तो श्रीकृष्णाशींच. हा तिचा निश्चय तिचे बापास फार आवडला, परंतु तिच्या भावाच्या मनांत आपला मित्र, शिशुपाळ, याला ती अर्पण करावी असें होतें. त्यानें तिच्या निश्चयाकडे लक्ष्य दिलें नाहीं इतकेंच नव्हे, तर आपल्या वडिलांचेंहि सांगणें न जुमानतां आपल्याच हट्टानें शिशुपाळाशीं वाग्निश्चय करून लौकरच विवाहसमारंभास देखील सुरुवात केली. जसजशी विवाहतिथि जवळ येत चालली, आणि शिशुपाळा कडचें वऱ्हाड येऊन थडकलें तसतसें रुक्मिणीचें मन फारच उद्विग्न होत चाललें. तिला त्या संकटांतून पार पडण्याची युक्ति सुचेना.

आईबापांचें साह्य उपयोगी पडेना; भावाची जों जों विनवणी करावी तों तो तो ज्यास्तच आग्रहास पेटूं लागला. तेव्हां आपली नैसर्गिक संकोचवृत्ति निरुपायामुळें जरा

एकीकडे ठेवून तिनें स्वाभिप्रायदर्शक, विनंतिपुरःसर एक निमंत्रणपत्रिका लिहून सुदेव नांवाच्या ब्राह्मणाच्या हातीं ती तावडतोब श्रीकृष्णाकडे रवाना केली. कृष्णानें एखा द्या प्रेमपत्रिकेप्रमाणेंच तिचें अभिनंदन करून तो तत्काल रथारूढ झाला व रुक्मिणीच्या ऐन विवाहकाळीं प्रकट होऊन तिला हरण करून चालता झाला. पुढें युद्धांत शिशुपाल, वक्रदंत यांचा वध करून व रुक्मिणीच्या भावाचाहि पराभव करून पुढें शास्त्रोक्त समारंभानें उभयतांचा विवाह झाला. रुक्मिणीनें लिहिलेल्या प्रेमपत्रिकेंतला मतलब आह्मी खाली देतों, त्यावरून रुक्मिणीचें श्रीकृष्णाच्या ठिकाणीं असलेलें प्रेम, त्या प्रेमाचें सविनय दर्शन व श्रीकृष्णालाच पति करण्याविषयीं तिचा दृढनिश्चय, हीं चांगलीं लक्ष्यांत येतील.

॥ श्री ॥

श्रीमंत षड्गुणैश्वर्यमंडित

यदुवंशतिलक द्वारकाधीश श्रीकृष्णमहाराज,

यांचे चरणकमलीं.

दासी रुक्मिणी हिची प्रेमपूर्वक विनंति— श्रोत्यांच्या श्रवणरंध्रांत शिरतांक्षणींच त्यांचे त्रिविध ताप दूर व्हावेत, असे आपले लोकोत्तर गुण मीं ऐकल्यामुळें मी आपली स्वाभाविक लज्जा जरा दूर करून आपणास वरण्याची इच्छा सादर करत्ये आहें याची क्षमा करावी. ऐश्वर्य, विद्या, वय, रूप इत्यादि गुणांनीं अगदीं आत्मतुल्य असा पति आढळल्यावर कुलीनतेचा किती जरी बाणा बाळगला तरी धीर कसा निघावा बरें! त्यांतूनहि मी एकदम अशी

निर्लज्ज झाल्यें नसत्यें. परंतु मी आपलें सर्वस्वीं देहार्पण आपल्या चरणीं केलें असून, आतां याजवर स्वामित्व आपलेंच काय तें आहे असें मानीत असतां, माझ्या भावाच्या दुराग्रहामुळें, हा आपणा नृसिंहाचा भाग तो त्या शिशुपाळरूप जंबुकाचे स्वाधीन करण्यास सिद्ध झाला आहे; तेव्हां हें वर्तमान आपणास कळलें ह्मणजे आपण मनोवेगानें त्वरित येऊन हा आपला भाग हरण करून न्याल ह्या हेतूनें ही पत्रिका पाठविली आहे. अनेक सेवक-जनरक्षित अशा अंतःपुरांतून मला कसें घेऊन जातां येईल अशी कदाचित् आपल्या मनांत शंका येईल; पण आपण माझ्या ठरलेल्या विवाहतिथीचे दिवशीं सैन्यासहवर्तमान यावें; आमच्या एथील कुळधर्माप्रमाणें मी त्या दिवशीं ग्रामदेवतेच्या दर्शनाकरितां ग्रामाबाहेर येईन; तेथून माझें हरण करावें. आतां आजपर्यंत नियम, व्रतें, दानधर्म इत्यादि पुण्यकर्मे जर मजकडून घडलीं असतील व त्या पुण्यकर्मांविषयीं कर्तृत्वाभिमान स्वतः न बाळगतां तीं सर्वेश्वरार्पण करीतच जर मीं आचरलीं असतील, तरच आपण येऊन माझें पाणिग्रहण कराल अशी माझी प्रतिज्ञा आहे. आणि ही प्रतिज्ञा इतकी निश्चयपूर्वक आहे कीं, ती जर अन्यथा झाली तर मग मी अशीच विदेही होऊन आपलें नामस्मरण करीत आयुष्य दवडीन आणि शेवटीं तरी आपल्या चरणाच्या आश्रयास येऊन विश्रांति पावेन. हीच विनंति."

"दासी, रुक्मिणी."

# सीता आणि लोपामुद्रा.

रावणवधानंतर रामचंद्राची स्वारी सीतेसहवर्तमान आगस्तिऋषीच्या आश्रमास आल्यावर आगस्तिऋषीची पत्नी, लोपामुद्रा, हिनें सीतेचें पुष्कळ आगतस्वागत केलें. नंतर सीतेला एकंदर वनवासाची हकीकत विचारीत असतां रामाचें तुजवर प्रेम कसें काय आहे हेंहि विचारलें, त्या वेळीं सीतेनें सर्व हकीकत सांगितली आहे ती अशी:– " बाई लोपामुद्रे, काय सांगावें, रामचंद्राच्या सहवासांत असतांना मला बाई वनवास अत्यंत सुखाचा गेला. मी जे जे इच्छाभोग मनांत आणले ते ते रामचंद्रानें तत्काल पुरविले. उन्हांतून आलेल्यास जशी सावली गोड वाटते तसाच वनांत रामचंद्राचा सहवास मला गोड वाटत होता. मेघाला समोर पाहिलें ह्मणजे मोर जसे आनंदानें नाचत असतात, तसें रामचंद्राच्या सान्निध्यानें मी आनंदानें वागत असे. मार्गानें चालतांना रामचंद्रानें वरचेवर थांबून प्रेमानें मागें पहावें, व मी जवळ आल्यें ह्मणजे चालूं लागावें. माझी माता पृथ्वीहि मला दुःख देत नसे. व आमचा कुलपति सूर्यनारायण तर मजसाठीं चंद्राप्रमाणें शीतल होत असे. रामचंद्राबरोबर असल्यानें भूमीवरील शयनसुद्धां आह्मांस सुखकरच वाटे. "

याप्रमाणें पतिसहवाससुखाचें वर्णन झाल्यावर सीतेनें अत्रि ऋषीच्या आश्रमांतील अनुसूयेच्या आतिथ्यकौशल्याचें वर्णन केलें. नंतर रामचंद्राचा एकेक पराक्रम सांगूं लागली. सांगतां सांगतां पतिप्रशंसेच्या भरांत रामानें समुद्रांत सेतु बांधून

वानरसैन्य समुद्र उतरून नेलें हीहि हकीकत ती बोलून गेली.

लोपामुद्रेच्या पतीनें एकाच आचमनांत सर्व समुद्र प्राशन केला होता; तेव्हां तिच्याजवळ ही सेतुबंधाची हकीकत सांगितलीस तर तुझ्या फुशारकीची किंमत कमी होईल असें रामचंद्रानें सीतेस पूर्वींच सांगून ठेवलें होतें; पण आपल्या पतीचे पराक्रम सांगण्याच्या नादांत तिला विस्मरण होऊन सेतूची हकीकत ती बोलून गेली. तेव्हां लोपामुद्रा मध्येंच तिला लावून बोलण्याच्या इराद्यानें ह्मणते कीं, काय? समुद्र तरून जाण्यासाठीं रामानें सेतु बांधला? इतका का अट्टहास रामाला करावा लागला! आमच्या इथें बाई एकाच आचमनानें सर्व समुद्र शोषून टाकला होता,तें तुला माहीत असेलच."

लोपामुद्रेनें आपल्या पतीची योग्यता अशी एकदम कमी केलेली सीतेस बरी वाटली नाहीं.ती मोठी चतुर होती.तिनें लागलीच उत्तर केलें कीं, "समुद्र सहज शोषून टाकण्याचें सामर्थ्य माझ्या रामचंद्रांत नव्हतें ह्मणून त्यानें सेतुबंधाचा हा आयास केला असें कांहीं तूं समजूं नकोस. रामचंद्राच्या सैन्यांत एकेक वानरसुद्धां असे पराक्रमी होते कीं, त्यांनींदेखील सहज समुद्र पिऊन टाकला असता. पण आतां समुद्र पूर्वींचा शुद्ध राहिला नाहीं. तुझ्या पतीनें तो चुळीनें प्राशन करून हल्लीं मूत्ररूपानें तो पुनः सांठविला आहे ह्मणून त्याच्या अपवित्रतेमुळें त्यास कोणीं शिवलें नाहीं!" सी-

तेचें हें समयोचित उत्तर ऐकून सर्वांस आनंद झाला, व तिच्या पतिनिष्ठपणाची तारीफ सर्वांनीं केली.

---

# लक्ष्मी आणि पार्वती यांचा संवाद.

एकदां लक्ष्मी व पार्वती यांची गांठ पडली असतां लक्ष्मीनें आपल्या नेहमींच्या तोऱ्यानें पार्वतीची थट्टा करावी ह्या हेतूनें तिच्या पतीस उद्देशून प्रश्न विचारला कीं, "कां पार्वतीबाई, भिक्षु कोठें आहेत ?" शंकराची भिक्षावृत्ति मनांत आणून लक्ष्मीनें असा प्रश्न केला होता. परंतु पार्वतीनें उलट तिलाच लाजविण्यासाठीं, विष्णूनें वामनावतारीं बळीपाशीं भूमिदान मागितलें होतें, तो संबंध मनांत आणून उत्तर केलें कीं, "भिक्षु बळीच्या यज्ञांत दान मागायास गेला आहे." लक्ष्मी आपल्यावर आलेली बाजू सांवरून घेण्याच्या उद्देशानें पुनः विचारते कीं, "अग तसें नव्हे; पशुपति ( शंकराचें नांव ) कोठें आहेत ?"

हाहि प्रश्न, लक्ष्मीच्याच आंगावर यावा ह्या हेतूनें पार्वती पुनः तसेंच उत्तर करते कीं, "पशुपति तर गोकुळांत गुरें राखीत असेल !"

लक्ष्मीः—"अग मी विचारतें, तो सर्पाधीश ( सर्प ज्याच्या आंगावर असतात असा शंकर ) कोठें आहे?"

पार्वतीः—"क्षीरसमुद्रांत ( शेषावर )नाहीं का पडलेला!"

लक्ष्मीः—"बरं आतां सांग, तो स्मशानवासी ( शंकराचें नांव ) कोठें आहे !"

पार्वतीः—" अग बाई, वृंदेजवळच तर आहे ! "

वृंदा ही जालंदर नामक एका बलाढ्य राक्षसाची स्त्री होती. ही महान् पतिव्रता असे, त्यामुळें तिच्या पातिव्रत्याच्या पुण्याईनें जालंदर हा सर्वत्र विजयी असून देवांना सुद्धां अजिंक्य झाला होता. तेव्हां त्याजपासून जगतास होत असलेली पीडा दूर करण्याच्या उद्देशानें महाविष्णूनें जालंदराचें रूप धारण करून वृंदेचें पातिव्रत्य भ्रष्ट केलें. तिजकडून घडलेल्या या पातकानें जालंदराची यशहानि होऊन तो युद्धांत मरण पावला. पुढें हें कपटकृत्य वृंदेस समजतांच तिला अत्यंत वाईट वाटून तिनें ' तुला स्त्रीवियोग होईल ' असा विष्णूस शाप दिला व त्या शापाप्रमाणें पुढें रामावतारीं विष्णूस स्त्रीवियोगदुःख भोगावें लागलें. इकडे वृंदा जालंदराबरोबर सती गेली. परंतु तिच्या शापवचनामुळें विष्णूच्या मनांत असमाधान उत्पन्न झाल्याकारणानें, तिच्या आज्ञेप्रमाणें स्मशानांत ज्या ठिकाणीं ती सती गेली तेथें उत्पन्न झालेल्या, तुळशीशीं विष्णूनें विवाह लावून घेतल्यावर त्याचे मनास शांति झाली. ह्या कथेस अनुलक्षून वरतीं पार्वतीनें लक्ष्मीच्या शेवटच्या प्रश्नास उत्तर दिलें. हा उभयजणींचा संवाद केवळ विनोदपर आहे.

---

# द्रौपदीच्या मनाचा मोठेपणा.

---

पांडव वनवासांत असतां एके वेळीं द्रौपदीला धौम्यऋषींचे स्वाधीन करून ते मृगयेस गेले. धौम्यऋषि आपल्या

नित्यकर्मांत गुंतले असतां केवळ करमणुकीकरितां द्रौपदी आश्रमाच्या दारांत उभी होती. इतक्यांत त्या वाटेनें जयद्रथाची स्वारी रथांत बसून चालली असतां त्यानें हिला द्रौपदी असें न ओळखून, हिची रूपसंपन्नता व एकांत आश्रमस्थिति मनांत आणून हिचा अभिलाष करावा असा विचार मनांत आणला. पुढें तृषा भागविण्याच्या निमित्तानें आपल्या मित्रास तिजकडे प्रथम पाठविलें. पण त्या मित्रास जेव्हां तिचें सर्व वर्तमान कळलें तेव्हां पांडवांच्या भीतीनें त्यानें जयद्रथाचा उद्देश तिला कांहींएक न कळवितां मुकाट्यानें परत येऊन जयद्रथासहि तेथून सत्वर निघून चलावें असें ह्मटलें.

द्रौपदीचें नांव ऐकतांच जयद्रथसुद्धां प्रथम विचारांत पडला खरा; पण पांडव मृगयेस गेले आहेत, आश्रमांत द्रौपदी एकटी आहे, त्यांत हल्लीं ती वनवासामुळें फार दरिद्रस्थितींत आहे इत्यादि गोष्टींनीं तिची सहजवश्यता निदान सुलभसाध्यता त्याच्या लक्ष्यांत येऊन आपल्या मित्राच्या उपदेशपर भाषणाकडे चित्त न देतां तो एकदम द्रौपदीच्या आश्रमांत गेला. आपला दीर, जयद्रथ आहे असें जाणून द्रौपदीनें त्याचें उत्तमप्रकारें आगतस्वागत केलें. जयद्रथानें प्रथम तिच्या वन्यस्थितीविषयीं पुष्कळ कळवळा दाखविला, पुढें धर्मराजानें तिच्यासह आपणास द्यूतांत जिंकून घेतलें या त्याच्या मूर्खपणाबद्दल त्याचा पुष्कळ उपहास केला व अशांच्या सहवासानें जी दुर्दैवस्थिति तिच्या सारख्या 'रूपयौवनसंपन्न स्त्रियेला' भोगावी लागत आहे तिचा

आपल्या हातून परिहार करण्याची इच्छा दर्शविली.

जयद्रथाचा वाईट उद्देश द्रौपदीच्या लक्ष्यांत एकदमच न आल्यामुळें तिनें शांतपणानें व पूर्ण समाधानवृत्तीनेंच त्याला मर्यादशील उत्तरें दिलीं. पण पुढें जेव्हां त्यानें आपलें दुष्ट-हेतु-जाल हळुहळु पसरण्यास प्रारंभ केला व त्यास चिचकून ती जसजसी निसटून जाण्यास पाहूं लागली तसतसें याच्या दांडगेपणाचें चिन्ह तिला दिसूं लागलें, तेव्हां मात्र ती रागानें लाल होऊन जयद्रथास पुष्कळ निर्भत्सनापूर्वक भाषणें बोलली. तरीहि तो ऐकेना, तेव्हां परस्त्रीअभिलाषबुद्धि धारण केल्यानें जे जे दुष्परिणाम भोगावे लागतील त्यांजबद्दल चांगला उपदेश केला, पण तो कामांध तिच्या कोणत्याहि भाषणाला न जुमानतां एकदम तिला आपल्या रथांत घालून चालता झाला.

कांहीं वेळानें पांडवांस ही बातमी कळतांच भीमानें जयद्रथाचा पाठलाग करून त्याला गांठलें. पांडवांना पाहतांच जयद्रथानें भिऊन द्रौपदीला रथाखालीं उतरून सोडून दिलें व आपण पळाला; परंतु भीमानें त्याचा पाठलाग करून त्याला धरिलें; आणि त्याच्याच रथाशीं बांधून त्याला धर्मार्जुनांकडे परत आणलें. ती त्याची विटंबना, पराजय, व लज्जेनें म्लान झालेलें मुख पाहून द्रौपदीस दया आली; व त्यानें दिलेली पीडा व बोललेलीं अभद्र भाषणें कांहींसुद्धां मनांत न आणतां त्याला जीवदान देऊन गौरवून सोडून द्यावा, एतद्विषयीं भीमसेनाजवळ तिनें मध्यस्थि केली. धर्माचेंहि त्याचप्रमाणें सांगणें

होतें; त्याला " द्रौपदीच्या मनाचे मोठेपणा " ची संमति मिळतांच दुष्ट जयद्रथ भीमाच्या हातून आपली सुटका झाली याजबद्दल मनांत आनंद मानीत पळून गेला.

---

# तारा.

——::०::——

रामचंद्रानें वालीचा वध केल्यानंतर त्याची पत्नी तारा व पुत्र अंगद ही दोघें वालीच्या प्रेतापाशीं येऊन अत्यंत शोक करूं लागलीं. त्यावेळीं तिचें शांतवन करण्याचा पुष्कळांनीं प्रयत्न केला; परंतु तिचा दुःखशोकवेग कमी होईना. वालीच्या प्रेतावर पडून त्यासह माझें दहन करा, नाहींतर आणखी एक बाण मजवरही टाकून मला माझ्या पतीमागून जाऊं द्या, असें ती रामचंद्रास ह्मणूं लागली. तेंव्हा रामचंद्रानें तिच्याशीं पुढें दिल्याप्रमाणें प्रसंगोचित व सदुपदेशपर संवाद करून तिच्या दुःखशोकाचें परिमार्जन केलें.

रामचंद्रः—तारे, तूं कशासाठीं एवढा आकांत करात आहेस हें मला सांगशील ?

ताराः—रामचंद्रा, हें तुह्मी मला विचारतां तरी काय? अहो, माझा पति मृत्युवश झाल्यानें पतिवियोगदुःखामींत मी पोळत्यें आहे ना ?

रामचंद्रः–काय, तुझा पति मृत्युवश झाला ! कोण तो ?"

ताराः–कोण ह्मणजे ! वाली नव्हे का ?

रामचंद्रः–आणि त्याचा तुझा वियोग झाला ?

तारा:–तो मला टाकून गेला, मी आतां अनाथ झाल्यें ?

रामचंद्र:–अगे, ज्या देहाला वाली ह्मणतात, तो तर हा एथेंच अजून पडला आहे. घेऊन जा पाहिजे तर. त्याचा तुझा वियोग झाला ह्मणून ह्मणतेस हें कसें ?

तारा:–रामचंद्रा, मला असें वेड लावूं नका. अहो, या शरीरांतला आत्मा गेल्यावर आतां या शरीरास घेऊन काय करावयाचें आहे!

रामचंद्रः–असें खरें ना; मग कां तर या प्रेतास कंवटाळते आहेस? सोड तें. हें शरीर बोलूनचालून नाशवंत. केव्हां तरी नाश व्हावयाचेंच. मग त्याजबद्दल एवढें तारांगण कशाला करावयाला पाहिजे. आतां तूं आत्मा गेला ह्मणून शोक करीत असशील तर तो गेला कोठें ? तो तर अजरामर आहे. त्याला जन्म नाहीं, मरण नाहीं, स्त्रीत्व नाहीं, पुरुषत्व नाहीं. तूं लग्न जें लावलेंस तें काय त्या आत्म्याशीं लावलेंस होय ? पाण्यानें भरलेल्या हजारों लहानमोठ्या भांड्यांत ज्याप्रमाणें सूर्याचीं प्रतिबिंबें पडलेलीं असावीं तसेंच या संपूर्ण जीवांचेठायीं आत्म्याचें दर्शन आहे. तें दर्शन झाल्याबद्दल सुख तें काय आणि गेल्याबद्दल दुःखहि पण काय मानावयाचें आहे ? ब्रह्मादिपिपीलिकापर्यंत हा सर्व मायामय पसारा आहे. हा आज आहे, उद्यां नाहीं असा तर अशाश्वत आहे. तेव्हां याजविषयीं अंतःकरणांत रागद्वेष काय मानावा हें सांग बरें ? भांडें फुटलें, व त्यांतील पाणी झिरपून गेलें, आणि त्यामुळें आंतलें प्रति-

बिंबहि नाहींसें झालें, हें पाहून जर एखादा मनुष्य तेथें आक्रांत करीत बसला तर तूंच त्याला हंसशील, नाहीं काय ? याकरितां नीट विचार करून या व्यर्थ शोकाचा उपरम कर.

किती समयोचित भाषण हें ! विषयप्रेमानें आंधळें होऊन दुःखशोकसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या अभागी मनुष्याचें समाधान यापेक्षां अन्य कोणत्या शद्बांनीं होणार आहे बरें ?

---

# मंदोदरि.

सीता आपणास वश व्हावी; ह्मणून रावणानें पुष्कळ प्रकारचे उपाय योजून पाहिले. परंतु एकाचाहि उपयोग झाला नाहीं. एकदां त्याचे मनांत असें आलें कीं, ही कामगिरी आपल्या स्त्रीचे हातून चांगली बजावली जाईल. याकरितां त्यानें एके दिवशीं संधि साधून मंदोदरीजवळ ती गोष्ट काढली.

मंदोदरी महान् पतिव्रता होती. रावणानें सीतेचा छळ आरंभिलेला तिला मुळींच आवडत नव्हता; परंतु हा वेळपावेतों तिची व सीतेची प्रत्यक्ष भेट झाली नसल्यामुळें सीतेची वास्तविक योग्यता तिला समजली नव्हती. तेणेंकरून ती सीतेच्या बाबतींत फारसें मन घालून पतिइच्छेला विरुद्ध होत नसे. पण रावणानेंच आपण होऊन तिला आपल्या कामांत घेतल्यामुळें, अगोदर सीतेची प्रत्यक्ष भेट घेऊन कसाकाय तेथला

प्रकार आहे तो पाहून यावा असा **मंदोदरीनें** बेत केला. तेव्हां **पतीच्या** आज्ञेप्रमाणें ती लागलीच **सीतेच्या** दर्शनास निघाली. आपल्या भेटीस आज **लंकाधिपतिरावणाची** **पट्टराणी** **मंदोदरी** येत आहे हें **सीतेस** कळतांच तिला अतिशय आनंद झाला. ती आपल्या आसनावरून उठून **मंदोदरीस** सामोरी गेली, आणि तिचें उत्तमप्रकारें स्वागत केलें.

**मंदोदरीनें** **सीतेची** आदरबुद्धि, मर्यादशीलपणा, सुस्वभाव, रूपसंपन्नता, पातिव्रत्य वगैरे गुणसमुच्चय पाहिला; तेव्हां **सीतेविषयीं** तिच्या मनांत एकदम पूज्य बुद्धि उत्पन्न होऊन ती **सीतेच्या** चरणावर मस्तक ठेवूं लागली. परंतु **सीतेनें** तिला वरच्यावर थांबवून कडकडून आलिंगन दिलें. हा देखावा फारच मनोहर होता. खरोखर एखादा कुशल कारागीर * जर या **सीतामंदोदरीचे** भेटीचा देखावा चित्ररूपानें काढण्यांत आपलें कौशल्य खर्च करील, तर यासारखें हृदयंगम चित्र वठविणारे अन्य प्रसंग त्यास विरळाच अढळतील! अस्तु.

**सीतामंदोदरि** एकमेकींच्या गळ्यांत हात घालून एका आसनावर बसल्यानंतर क्षणभर दोघींसहि एकमेकींशीं काय बोलावें हें सुचेना. बराच वेळ स्तब्धपणांत गेला. **मग** **मंदोदरीस** **पतीच्या** आज्ञेचें स्मरण होऊन तिनेंच भाषण करण्यास सुरुवात केली. प्रथमतः आपली फार

* चित्रकलानिपुण प्रसिद्ध रविवर्मा यांणीं या सूचनेस मान द्यावा अशी आमची त्यांस विनंति आहे. पुराणांतील कित्येक प्रसंगाचे देखावे काढण्यांत त्यांचा हातखंडा आहे, हें सर्व श्रुत आहेच.

दिवसांची इच्छा होती त्याप्रमाणें आज दर्शनलाभ झाल्या-बद्दलचा आनंद दर्शवून वेदांत विचाराच्या सरणीनें तिनें रावणाची इच्छा सीतेच्या अंतःकरणांत भरवून देण्याची सुरुवात केली. ती ह्मणाली, " सीते, समुद्रावर अनेक जरी लाटा उसळल्या तरी पाणी तेथून सारखेच, किंवा ठिकठिकाणीं असंख्य घरें जरी असलीं, तरी त्यांत कापून येणारें आकाश तेथून एकच, नव्हे बेरं? त्याचप्रमाणें अयोध्याधीश प्रभु रामचंद्र हा तरी व्यापकपणानें असाच सर्वत्र भरला आहे. मग तूं रावण आणि रामचंद्र यांच्यांत भेदबुद्धि मानून एकाविषयीं तिरस्कार व दुसऱ्याविषयीं प्रेम मनांत कां बरें बाळगतेस ? "

मंदोदरीचें हें भाषण ऐकून सीतेस हंसूं आलें. ती ह्मणाली, "वाहवा, मंदोदरी, हा संबंध चांगला जुळविलास ! अगे, अशा दृष्टीनें पाहावयाचें तें इतकेंच पाहून चालत नाहीं. हें मतलबापुरतें पाहणें झालें. तीच सर्वत्र समदृष्टि घेऊन जर पाहूं लागलें तर मग कसा प्रकार दिसेल तो पहा. सर्वां घटीं एक परब्रह्म राम संचरला आहे असें समजल्यावर मग या निरनिराळ्या असंख्य घटांची मातब्बरि ती काय राहि-ली बरें.! हा सर्व पसारा अशाश्वत अर्थात् मिथ्या होय. मग त्यांत रावण कोठचा आणलास, मंदोदरी काय झा-ली, आणि मीहि कोठें राहिल्यें ?" या प्रकारें अद्वैत सिद्धांताच्या आधारानें सीतेनें आणखी बरेंच भाषण करून मंदोदरीस निरुत्तर केलें, इतकेंच नव्हे, तर क्षणभर तिला ब्रह्मानंदांतहि तल्लीन करून सोडलें. सीतेची अशी महान योग्यता मंदोदरीनें पाहून तिला फार आश्चर्य वाटलें;

नंतर तिला पूज्य बुद्धीनें नमस्कार करून मंदोदरी आपल्या महालांत परत आली.

इकडे रावण तिच्या येण्याची वाट पाहत होताच. त्यानें तिला भेटीची हकीकत विचारतां तिनें पुष्कळ प्रकारें त्यास उपदेश करून सीतेचा नाद सोडून द्यावा, इतकेंच नव्हे, तर मोठ्या सन्मानानें तिला रामचंद्राकडे पोहोंचवून कृतापराधाबद्दल उभयतांची क्षमा मागावी, असें सांगितलें. ती ह्मणाली:—

तप्तलोहावरी उदक पडलें ॥ तें माघारें निघे एक वेळे ॥
परी जानकी कदा काळें ॥ वश नोहे तुह्मातें ॥ १ ॥
ज्या गोष्टीनें होय अनर्थ ॥ आपले कुळाचा होय घात ॥
ऐशा बुद्धीनें पंडित ॥ कालत्रयीं न वर्तती ॥ २ ॥
परसतीचा अभिलाष ॥ महापुरुषास ठेवणें दोष ॥
बलवंताशीं बांधणें कास ॥ मग अनर्थास काय उणें ॥३॥
महासर्प उशीं घेऊनी ॥ कैसा निजेल सुखशयनीं ॥
बळेंच गृहासि लावल्या अग्नी ॥ मग अनर्थास काय उणें ।
परद्रव्याचा अभिलाष ॥ जाणोनि प्राशन करणें विष ॥
करितां परनिंदा द्वेष ॥ मग अनर्थासि काय उणें ॥५॥

या भाषणाचा रावणाच्या मनावर चांगलासा कांहीं परिणाम झाला नाहीं. कांहीं तरी तिला उत्तर देऊन तो तेथून निघून गेला व त्याच्या मूर्ख व आग्रही वर्तनाबद्दल ती चिंताक्रांत होऊन स्तब्ध राहिली.

---

# सुलोचना.

---:०:---

इंद्रजित ज्या वेळीं रणामध्यें पडला त्या वेळीं त्याचा एक हात तुटून तो त्याची पत्नी, सुलोचना, आपल्या महालांत बसली होती त्या ठिकाणीं येऊन आदळला. सुलोचना ही महान् साध्वी स्त्री होती. इंद्रजितानें मोठ मोठे पराक्रम केले ते केवळ सुलोचनेच्याच पुण्यबळावर होत. त्या दोघां स्त्री पुरुषांचें परस्पर प्रेम कांहीं विलक्षण असे. या प्रेमाचा थोडक्यांत मासला, इंद्रजिताच्या त्या तुटलेल्या हातानें एक पत्र लिहून रणांतलें सर्व वर्तमान सुलोचनेस कळविलें आहे, त्यांत चांगला नजरेस येतो. सदहू पत्र येणेंप्रमाणें—

ऐकें दशशत[1]मुखकन्यके ॥ सुकुमारे चंपककलिके ॥
मममानस[2]सरोवरमराळिके ॥ प्राणवल्लभे सुलोचने १
जयाशा अंतरीं धरून ॥ गूढ[3] स्थळीं करितां हवन ॥
अग्नींतूनि दिव्य स्यंदन[4] ॥ निघाला पूर्ण राजसे ॥ २ ॥
फळप्राप्तीचा समय लक्षून ॥ शत्रु आले तेथें धांवून ॥
चंड शिळा वरी घालून ॥ आराध्यदैवत क्षोभविलें ॥ ३ ।
जेवीं पर्वत चढतां संपूर्ण ॥ शिखराहून दिधला ढकलून।
कीं नदी अवघी उतरून ॥ तीरासमीप बुडाला ॥ ४ ॥
वल्लभे तैसेंच एथें झालें ॥ शत्रूंनीं शेवटीं वैर साधिलें ॥
प्रारब्धबळ उणें पडलें ॥ होणार न टळे कल्पांतीं । ५ ।

---

१ सहस्रमुख जो शेष त्याची मुलगी (सुलोचना); २ माझें मनहें. रुपसरोवर त्यांतलं निरंतरराहणारी हंसपक्षीण; ३ गुप्तठिकाणीं; ४ रथ;

पुढे दारुण संग्राम मांडला। परी जयआशेला पारखो झाला ॥
जाऊन सौमित्रास मिळाला ॥ शत्रूचा वाढला पराक्रम ॥ ६ ॥
सौमित्र परम निधडा वीर ॥ धनुर्विद्या त्याची अपार ॥
देखोनि उचित दिधलें शिर ॥ राम मित्र जोडला ॥ ७ ॥
देहाशेसि जीवीं धरून ॥ भयें शरण गेला बिभीषण ॥
म्यां देहत्रय निरसून ॥ विदेहजामात[4] मित्र केला ॥ ८ ॥
सौमित्र तपस्वी पूर्ण विप्र ॥ बहुत दिवसांचा निराहार ॥
उतरूनिया सिंधु समग्र ॥ मागावया शिर पातला ॥ ९ ॥
मग मी कृपणता टाकून ॥ निजशिराचें केलें दान ॥
तेणें रामचरणीं नेऊन ॥ शिर माझें समर्पिलें ॥ १० ॥
शरीर हेंचि आहे रणीं ॥ शिर पाहूं गेलें चापपाणी ॥
तुज मूळ धाडिला पाणी ॥ वेगें करूनि येई कीं ॥ ११ ॥
मायानदी उल्लंघूनि दुर्घट ॥ पाहे पैलतीरीं तुझी वाट ॥
प्राणवल्लभे येऊनि भेट ॥ सत्वर आतां मजलागीं ॥ १२ ॥
दुःखरूप परम संसार ॥ रामचरणीं सुख अपार ॥
हें जाणोनि धाडला कर ॥ येई सत्वर प्राणप्रिये ॥ १३ ॥

स्त्रीपुरुषांच्या परस्पर प्रेमाचें किती उत्कृष्ट दर्शन हें!

---

१ पाठिमोरा; २ लक्ष्मणास ३ आपला देह वांचावा ही आशा धरून बिभीषण आमचा पक्ष सोडून रामास जाऊन मिळाला; पण मी तर आपला देहच टाकून देऊन रामाशीं स्नेह केला आहे ४ जनकाचा जांवई (राम). ५ चौदा वर्षे निराहार व वनवासी असा जो पुरुष असेल त्याचे हातून इंद्रजिताचा मृत्यु होता, त्याप्रमाणें व्रतस्थ लक्ष्मण राहिला होता त्यास अनुलक्षून ही ओवी आहे. ६ राम. ७ हात.

# श्रीकृष्ण व गोपी यांचा संवाद.

---::०::---

एकदां गोपींच्या मनांत असें आलें कीं,आपण आपलें घरदार तुच्छ करून श्रीकृष्णावर किती जरी आसक्ति ( आषकता ) ठेवली, तरी त्या पुरुषाच्या तें गांवीं सुद्धां नसतें;आपल्या या सर्वस्वार्पणास द्यावें तितकें महत्व तो बिलकुल देत नाहीं.तेव्हां सगळया जणींनीं मिळून श्रीकृष्णास गांठलें, आणि त्याच्या त्या बेपरवाईपणाबद्दल त्याला लाजून बोलण्याच्या हेतूनें त्यास उपरोधिक प्रश्न करण्यास सुरुवात केली. पण श्रीकृष्ण कसला छट;त्यानें ज्या झोंकाचा प्रश्न त्याच झोंकाचें उत्तर द्यावें;असें त्यांना निरुत्तर करून वाटेस लावलें!पुढील चुटक्यांत त्याच प्रश्नोत्तरांचा सारांश आहे.

गोपी विचारतात:—

भजतोऽनुभजन्त्येक एक एतद्विपर्ययं ॥
नोऽभयांश्च भजन्त्येक एतन्नोब्रूहि साधुभोः ॥

"कृष्णा, या जगांत कांहीं लोक असे आहेत कीं,आपली सेवा करणाऱ्यांस ते त्यांच्या सेवानुसार फल देतात, कांहीं दुसऱ्यांकडून सेवेची अपेक्षा न करतां हि त्यांस फल देतात;व कांहींजण तर आपली सेवा करणारे आणि न करणारे या दोघांसहि पुसतनाहीं.तेव्हां,अहो महाराज,यांतला मतलब काय असावा बरें,हें आह्मांस सांगाल काय?"
श्रीकृष्णानें यावर उत्तर दिलें:—

मिथो भजंति ये सख्यः स्वार्थैकांतोद्यमाहि ते ॥

न तत्र सौहृदं धर्मः स्वार्थार्थं तद्धिनान्यथा ॥१॥
भजंत्य भजतो येवै करुणाःपितरो यथा ॥
धर्मो निरपवादोत्र सौहृदंच सुमध्यमाः ॥ २॥
भजतोऽपिनवैकेचित् भजंत्य भजतःकुतः ॥
आत्मारामा ह्याप्तकामा अकृतज्ञा गुरुद्रुहः ॥ ३॥

"गोपी हो, याचा मतलब तुमच्या नाहीं का ध्यानांत आला? ऐका तर, मी थोडक्यांत तुह्मांला सांगतों. हें बघा, आपल्यावर उपकार करणारास त्याजवर प्रत्युपकार करण्याच्या बुद्धीनें जें भजणें तें कांहीं खरें भजणें नव्हे. हा तर मुख्यत्वेकरून केवळ स्वार्थाविषयींच उद्योग झाला. मग तेथें सख्य कसलें? अर्थात अशा करण्यापासून सुखहि नाहीं व धर्महि नाहीं. अशा रीतीनें परस्परांचें भजणें ह्मटलें ह्मणजे दुभत्या गाईचें भजन तिचा धनी करीत असतो त्यात्र योग्यतेचें होय!—१—तसेंच हें सुंदरकटि गोपी हो, आणखी असें पहा कीं, आपणास न भजणाऱ्यांसहि भजणारे ह्मटले ह्मणजे एक करुणाशील साधुपुरुष किंवा दुसरे आपले मातापितर हेच होत; यांशिवाय तिसरें कोणी नाहीं. कारण साधु पुरुषांच्या ठायीं निर्दोष धर्म वास करीत असतो आणि मातापितरांच्या ह्रदयामध्यें निष्कपट कळवळा (अथवा वात्सल्यधर्म) असतो.—२—आपणास भजणारांना ही जे भजत नाहींत ते न भजणारांस तरी कोठून भजणार आहेत हें दिसतेंच आहे! आतां जे मुळींच कोणास भजत नाहींत त्यांचे चार प्रकार आहेत ते येणें प्रमाणेः—१ निरंतर समाधि योगानें आत्मस्वरूपीं रममाण असणारे; २ सदा तृप्त असल्यामुळें विषयभोगाविषयीं अगदीं

निरिच्छ; ३ अत्यंत मूढ; आणि ४ मातापितरादि गुरुजनांचा निर्दयपणें द्रोह करणारे. तेव्हां गोपी हो तुम्ही विचारलेल्या गोष्टींतला मतलब ह्या एवढ्या प्रकारांतून काढून घ्या कसा!"

प्रकरण सातवें समाप्त.

---

# स्त्रियांचें परावलंबन.

## ( प्रकरण आठवें )

—:*:—

क्वादित्यस्य प्रभा याति, रत्नेभ्य क्व द्युतिः पृथक ॥
क्वार्थो वर्णालिकाव्यक्तः कथं त्वं गिरिशंविना ॥१॥

शिरोभागीं दिलेला हा श्लोक मत्स्यपुराणांत आढळतो. ह्यांतील उद्गार पार्वतीला संबोधून कोणा एका ऋषीचे मुखांतून निघाले आहेत. ते असे कीं, हे पार्वति, " सूर्याची कांति त्यास सोडून कोठें जाते ? तसेंच रत्नाचें तेज त्यापासून वेगळें कोठें असतें ? अर्थ हा वर्णपंक्ति सोडून कोठे बरें स्पष्ट दिसतो ? त्याच प्रमाणें तूं शिवावांचून कशी बरें राहशील ? " यांत पतिपत्नीचा अगदीं एकजीवी संबंध व विशेषतः स्त्रियांचें पत्यावलंबन सुरेख रीतीनें व्यक्त केलें आहे. हा संबंध आमच्यांतील सद्गुणी स्त्रियाहि मोठ्या आनंदानें मान्य करतात हें पुढील एका प्रसंगावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

रामचंद्र वनवासास जावयास निघाला असतां त्यानें सीतेस सांगितलें कीं, तुला रानावनांतून फिरणें व कंदमूळावर उपजीवन करणें फार जड जाईल, याकरितां तूं

एथेंच मातोश्रीजवळ रहा; किंवा पाहिजे तर माहेरीं जा. आम्ही पित्याचें वचन पूर्ण करण्याकरितां चौदा वर्षे अरण्यसेवन करून परत येऊं, त्या वेळीं तुला घेऊन येऊं. यावर त्या साध्वी स्त्रीनें उत्तर दिलें आहे तें असें:–

दीप सांडुनि निश्चिती ॥ प्रभा न राहे कल्पांतीं ॥
कनकासि टाकूनि कांति ॥ कदां परती नव्हेचि ॥ १ ॥
शशा वेगळी नोहे अंबिका॥किरणें न सोडिती कदा अर्का
साधुहृदय सांडून सद्विवेका ॥ कोठें जाणें घडेना ॥२॥
रत्नावेगळी कळा ॥ गोडी न सोडी गुळा ॥
कस्तुरी न सोडी परिमळा॥तेवी मी वेगळी नव्हेचि ॥३॥

स्त्रियांनीं नेहमीं पतीच्याच आश्रयानें असणें हें योग्य आहे. कनक आणि कांति, दीप आणि शोभा यांसारखा त्यांचा अगदीं एकजीवी संबंध केवळ प्रेमानें जडलेला असावा, कोणत्याहि कारणानें हा संबंध आजन्म तुटूं नये, व हा संबंध खुषीनें मान्य करण्याविषयीं वरतीं सीतेच्या मुखानें आमच्या स्त्रियांची जशी उत्सुकता आढळली, त्याप्रमाणेंच उलट पक्षीं पुरुषानेंहि:–

अन्नेन वाससा प्रेम्णा श्रद्धयामृतभाषणैः
सततं तोषयेद्दारां नाप्रियं क्वचिदाचरेत् ॥

"स्त्रीस धन आणि वस्त्रें द्यावीं, तिजवर प्रेम व विश्वास ठेवावा, तिच्याशीं सर्वदा मधुरच भाषण करावें, तिला नेहमीं संतुष्ट ठेवावें, व तिला अप्रिय वाटण्यासारखें आचरण कदापि करूं नये" अशाविषयीं तत्परता ठेवावी.

ज्या कुटुंबांत वर सांगितल्याप्रमाणें परस्परानुकूल वर्तन ठेवणारीं स्त्रीपुरुषांचीं जोडपीं आहेत तें किती

धन्य ह्मटलें पाहिजे ? मनुस्मृतींत एके ठिकाणीं* लिहि-ल्याप्रमाणें कल्याण तर अशाच कुटुंबांत सदोदित राहतें.

स्त्रियांच्या परावलंबनाविषयीं एथपर्यंत केलेला विचार ठीक आहे. स्त्रीपुरुषांची अशा प्रकारें वर्णन केलेली स्थिति असावी हें अलीकडल्या नव्या किंवा जुन्या कोण-त्याहि दृष्टीनें विचार करणाऱ्या मनुष्याला नाकबूल होणार नाहीं. जेथें कोठें असा उत्कृष्ट तऱ्हेचा पतिपत्नी-संबंध आढळण्यांत येईल त्या कुटुंबस्थितीचा लोभ प्रत्येक मनुष्यास उत्पन्न होईल. परंतु जीं काहीं कारणें कोठून, कशीं आणि कां उद्भवतात हें आपणास समजण्याची शक्ति नसल्यानें आपण त्यांस दैवयोग ह्मणतों, तसलें एखादें घातुक अदृष्ट कारण, अथवा आपल्या नेहमींच्या भाषेनें दुर्दैव जर त्या कुटुंबाच्या चालू सुखकर स्थितींत आडवें पडलें, तर मात्र मग स्त्रीपुरुषांच्या परस्परावलंबी स्थिती-विषयीं वरतीं सांगितलेलेच नुसते विचार मनांत आणून चालत नाहीं.

पतिपत्नींमधील केवळ प्रेम व धर्म यासंबंधानें बोल-तांना ते विचार उक्त आहेत, परंतु दुर्दैवाच्या खोडसाळ करणीनें जेव्हां जेव्हां स्त्रीपुरुषांचा चिरकाल वियोग होतो अर्थात् दोघांपैकीं कोणीतरी मृत्यु पावतो तेव्हां पुरुषांपेक्षां विशेषत: स्त्रीवर वियोगदु:ख सहन करीत मागें राहण्याचा

---

* संतुष्टो भार्यया भर्ता भर्ता भार्या तथैवच ॥
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वैध्रुवं ॥

अर्थ—" भर्त्याच्या योगानें भार्या व भार्येच्या योगानें भर्ता जेथें संतुष्ट आहेत, त्याच कुलांत नेहमीं कल्याण असतें."

प्रसंग आल्यानें, सर्वस्वीं परावलंबनाची झाली असलेली संवय तिला जी नडते, इतकेंच नव्हे, तर तिला नीचतर स्थितींतसुद्धा नेऊन पोंहोंचविते, ती कांहीं विचारूं नये.

पुरुषांची गोष्ट निराळी. स्वावलंबन हें त्यास बाळकडू असतें; व विद्या आणि स्वातंत्र्य हीं जीं स्वावलंबनाचीं जिवलग साधनें तीं त्यास बिनतक्रार प्राप्त करून घेतां येण्यासारखीं असतात. तशी स्त्रीजनांची गोष्ट नाहीं. स्वावलंबन या शब्दाची त्यांना ओळखसुद्धां नाहीं. तें अंगीं बाळगण्याच्या साधनापैकीं स्वातंत्र्यास त्या अनेक बऱ्यावाईट कारणांनीं कधींच त्या अगदीं अयोग्य ठरविलेल्या; आणि विद्येशीं तर त्यांचा कधींच फारकत होऊन राहिलेली. त्यांच्या जीवनाचा सर्वस्वभार कायतो एका पतिरूप तंतूवर. तेवढ्यावर त्या यावज्जीव लटकले-ल्या असावयाच्या. परमेश्वरकृपेनें तो तंतु सबळ निदान जीवमान आहे तोंपर्यंत त्यांची शोभा, महति किंवा चैन; परंतु दुर्दैवाच्या सपाट्यानें—कोणावरहि असा प्रसंग येऊं नये !—तो तंतु निर्जीव होऊन त्यापासून तुटून ह्या खालीं पडल्या-कीं, मग त्यांचें काय व्हावें याजविषयीं मनांत कल्पना आणावी तितकी थोडीच आहे.

संतति व संपत्ति यथायोग्य लाभून ज्यांचा संसार झाला आहे त्यांना परावलंबनाची लागलेली संवय जड वाटत नाहीं; पण असलें सुदैव सगळ्यांचेंच नसतें; आणि ज्यांचे असतें त्यांजवरहि दैवाची इतराजी ह्मणजे कधीं होणारच नाहीं अशीहि खात्री बाळगून असणें व्यर्थ आहे. सदाच सर्वांनीं स्वतंत्र असावें, किंवा सदाच सर्वांनीं स्वावलंबी

असावें असें आह्मी ह्मणत नाहीं. आम्ही एवढेंच सूचवून ठेवतों आहे कीं, नैसर्गिकच कांहीं अडचणीच्या स्थिति खेरीज करून बाकी सर्व स्थितींतल्या मनुष्यांची —मग स्त्री असो अगर पुरुष असो—प्रसंग पडल्यास परावलंबनाची आवश्यकता न बाळगतां स्वतांचे पायावर उभें राहतां येण्याची आपल्या पूर्वस्थित्यनुरूप योग्यता व तयारी असावी हें बरें.

आपल्या स्त्रियांची तशी योग्यता व तयारी असणें हें आपल्यामागें त्यांना नीच स्थितींत पडूं न देण्यास चांगलें आधारभूत तर होईलच; पण आपल्या ह्यातींत सुद्धां आपल्यावर बरावाईट प्रसंग गुजरल्यास त्यांतून आपल्यास बचावण्यासहि हेंच उत्कृष्ट साधन होणार आहे.

आमच्या एका मित्रानें आह्मास सांगितलेली एक गोष्ट या ठिकाणीं आह्मास आठवली आहे ती सांगतों; तिजवरून आह्मी शेवटीं केलेल्या विधानाचें तात्पर्य वाचकांचे ध्यानांत येईल.

एका शहरांत गणपतराव नांवाचा एक गृहस्थ राहत होता. या गृहस्थास एका कचेरींत पंधरा रुपये दरमहाची नौकरी असे. एकटे गणपतराव व त्यांचें कुटुंब, गंगु, ह्यांखेरीज घरीं कोणी तिसरें मनुष्य नसल्यामुळें तेवढ्या मिळकतींत त्यांचा चरितार्थ मोठ्या टूमदारीनें चालला होता. गंगू वयानें जरी पोक्त नव्हती तरी गणपतरावाचे सहवासानें व शिक्षणानें तिचें वर्तन व विचार यांत फारच पोक्तपणा आढळून येत असे. गणपतराव कचेरींत गेले ह्मणजे मागें आपणावर धाकदडपण ठेवण्यास घरांत

कोणी वडील माणूस नाहीं, ह्मणून गंगूनें कधींच हंसण्या-खिदळण्यांत किंवा शेजारींपाजारीं जाऊन गप्पागोष्टी सांगण्यांत वेळ दवडला नाहीं. कोणी शेजारीण आपण होऊन जरू क्षणभर बसावयास तिजकडे आली तरमात्र तिच्याशीं ती बोलत बसे; तरीसुद्धां हातानें तिचें कांहीं तरी विणणें, तुरपणें हें काम चाललेलें असे. सहजीं बोलतांना कोणाची निंदा करण्यांत किंवा ज्यांत कांहीं अर्थ नाहीं अशा गोष्टी सांगण्यांत ती आपला वेळ कधींच खर्चीत नसे. तिजकडे बसण्यास कोणी शेजारीण बाई आली तर किंवा ती एखादेवेळीं कोणा शेजारणीचे घरीं गेली तर बहुधा तिच्यापासून ती कांहींतरी घरकामासंबंधीं ह्मणा, किंवा उपयुक्त कौशल्यासंबंधी ह्मणा नवीन माहिती शिकून घेत असे. आणि तसें शिकण्यासारखें कांहीं नसलेंच तर देवाधर्माच्या गोष्टी बोलून ती आपला वेळ घालवित असे.

गंगूचा बहुतकरून नित्यक्रम ह्मटला ह्मणजे गणपतराव जेवून कचेरींत गेल्यावर तिनें घरकाम सर्व आटपून गणपतरावानें आणून दिलेल्या नीतिपर पुस्तकांपैकीं, पुस्तकें वाचीत बसावें किंवा कर्मणुकीसाठीं कांहीं कुशल-तेचीं कामें करावीं. तिच्या टापटीपेनें व सुग्रणपणानें गणपतरावाचें घर कसें सुशोभित वस्तूंनीं भरलेलें दिसे. सोयीची आणि उपयोगाची अशी कोणतीहि वस्तु, गरज लागली असतां, गणपतरावांना त्यांच्या घरांत सहसा दुर्मिळ नसे. गणपतराव फारसें कांहीं शिकलेले होते असें नाहीं; पण लहानपणापासून वाईट संगतीचा संपर्क त्यास

बिलकूल न लागल्यामुळें व जीं काय थोडींबहुत पुस्तकें त्यांच्या वाचनांत आलीं तीं बहुतेक न्यायप्रचुर व सन्मार्गबोधकच असल्यामुळें त्यांचेंहि वर्तन, विचार वगैरे पोक्त व सुजनपणाचेच असत. ह्या उभयतां पतिपत्नींचें परस्पर प्रेम चांगलें होतें. व समजूं लागल्यापासून कायतो दोघेंच एकमेकांना असल्याकारणानें तर दोघांचा एकमेकांवर जीव फार होता.

याप्रमाणें हें दंपत्य आनंदानें कालक्रमणा करीत असतां मध्यंतरीं दुर्दैव ओढवल्यामुळें कामांत कांहीं चुक झाल्याच्या आरोपावरून एकाएकीं **गणपतरावाची** नौकरी निघाली! लहानशी खरी, पण **गणपतरावांना** त्यांच्या चरितार्थास आधार कायतो तेवढ्या नौकरीचाच होता; आणि ती जेव्हां असा एकाएकीं तुटला तेव्हां पुढें आपली गत काय व्हावी ह्याजविषयीं ते मोठ्या विवंचनेंत पडले. **गंगूस** त्यांनीं आपल्यावरील हा प्रसंग कळविला तेव्हां तिला मोठें वाईट वाटलें; परंतु तिनें तशा प्रकारचें कांहींएक चिन्ह न दाखवितां उलटें **गणपतरावाचें** समाधान करूं लागली कीं, "अं:, तुला आपला अन्नपाण्याचा ऋणानुबंध म्हटलें, झालं. उद्योग केला असतां परमेश्वर आपला शेर भारणास कोठेंहि देईल." **गंगूच्या** अशा भाषणानें **गणपतरावास** थोडा धीर आला व निर्वाहाच्या आवश्यक साधनांची घरांत बेगमी आहे तोंच दुसरी कोठें तरी सोय पाहण्याच्या ते प्रयत्नास लागले. आज याच्याकडे जा, उद्यां त्याच्याकडे जा, इकडे अर्ज कर, तिकडे उमेदवारी·

ला जा ह्याप्रमाणें त्यांचा नित्यक्रम बनला. दोन्हीसांज जेवणापेक्षां त्यांचें चित्त घरीं लागेनासें झालें. घरची बेगमी जों जों संपत चालली आणि इकडे नोकरी लौकर लागण्याचें चिन्ह कांहींच दिसेना तों तों त्यांचा धीर फारच खचत चालला. कसातरी ठाकठीकीनें निर्वाह करीत होतों तेंहि न राहून आतां भिक्षा मागणें कपाळीं खास येतें या कल्पनेनें त्यांना पूर्ण घेरलें. यामुळें गणपतराव फारच घाबरून गेला.

गंगूनें आपल्या नवऱ्याचा विपत्काळ जाणून व आपल्या खऱ्या प्रेमाची कसोटी ह्याच वेळीं आहे असेंहि मनात आणून, तिनें कोणत्याहि प्रकारें आपल्या मनाची समता जाऊं न देतां, पूर्वीप्रमाणेंच उल्हासानें व तत्परतेनें पतीच्या शुश्रूषेंत व घरच्या व्यवस्थेंत दुर्लक्ष होऊं दिलें नाहीं. तिला वाटे कीं, मी अशी आनंदीमुखानें पति पुढें वागलें ह्मणजे तरी त्यांना थोडें समाधान वाटेल. आजपर्यंत तिच्या प्रफुल्लित वदनानें गणपतरावाच्या दमल्या भागल्या मनावर तसाच परिणाम करावा देखील. परंतु आपल्या इतक्या विपन्न स्थितींत देखील ही आपली तिकडे प्रीत आहे, हें पाहून आतां मात्र गणपतरावांचें तों गंगु हातपायीवृतीनें पूर्वीप्रमाणें सुख पावेना. उलटें गणपतराव एखलतेंच कांहीं घेतलें. त्यांना तिच्या प्रकारें विस्मय व अआळा. व वेगळ्याच कांहीं तरी गुप्त ठेवून त्यांजकडे धं असेल ह्मणूनच अशा ह्या ख्याली वांनीं तिला प्रेम ती आपल्या सांप्रतच्या या दारिद्र्यदशेला तिचा हातभावतेच आहे असें त्यांना वाटूं लागलें!

नोकरीसाठीं करावी लागत असलेली जबरदस्त यातायात; ती लौकर मिळत नाहीं या निराशेचा दुःसह ताप; आणि त्यावर हा असा प्रेमसंशय! मग गणपत-रावांची वृत्ति किती बिथरली असावी याची वाचकांनींच कल्पना करावी. तरी पण आपल्या मनांत आलेल्या संशयाचें शोधपूर्वक अगोदर निराकरण आपलें आपणच केल्यावांचून त्यांच्यानें त्याजबद्दल गंगूला ओळख देव-वेना. कारण तिच्या आजपर्यंतच्या सद्वर्तनाचा त्यांच्या अंतःकरणावर ठसाच तसा नामी उठलेला होता.

एके दिवशीं गणपतरावानें गंगूला असें सांगितलें कीं येथून २० कोसांवर एक गांव आहे त्या ठि काणीं नोकरीच्या संधानाकरितां मला जाऊन येणें आहे. त्याला ४।५ दिवस लागतील. तोंपर्यंत घर नीटपणें संभा-ळ. असें गंगुला गणपतरावानीं सांगितलें.गंगूला नवऱ्या-पासून कधीं एक दिवससुद्धां दूर राहण्याचा प्रसंग आला नव्हता; पण प्रस्तुतचा समय जाणून तिनें कांहींच हर-कत न घेतां मोठ्या आनंदानें फराळाचें करून देऊन नवऱ्याच्या जाण्याची तयारी केली. या योगानेंहि गणपत-रावाच्या संशयांत भरच पडली. असो, याप्रमाणें तें गांवाला जाण्याचें निमित्त करून बाहेर पडले. परंतु तेवढा दिवस तेथेंच एका स्नेह्याचे घरीं काढण्याचा त्यांचा विचार अस-ल्यामुळें ते त्याच्या घरीं जों जातात तों सुदैवानें त्यांना त्याजकडूनच नोकरीचें एक संधान जुळून आलेलें समजलें, व दुसऱ्यादिवसापासून तिजवर जाऊन रुजू होण्याचेंहि मुक्रर झालें

गणपतरावास त्या अकल्पित लाभानें आनंद तर झालाच; पण आतां उद्ईक आपण आपल्या पत्नीची जी परीक्षा पाहणार आहों तींत जर ती उत्कृष्टप्रकारें आपल्या पसंतीस उतरली, तर मात्र आपल्या, या आनंदाचें खरें कौतुक होणार आहे, असा विचार मनांत येऊन ते घरीं जाण्याविषयीं थोडे उतावळेहि झाले. पण आपली मनोवृत्ति तशीच दाबून ठेवून ती रात्र त्यांनीं स्नेह्याचेच घरीं काढली. दुसरे दिवशीं कामावर रुजू होऊन ते लौकरच उपल्या घरीं आले आणि पाहातात तों दारास आंतून लेली पाहे. गंगू घरांत एकटीच असल्यामुळें वेळेस आपल्या- ह्यातींत मारण्याचा त्रास पडूं नये ह्मणून गणपतरावांनीं स्वातंत्र्यआंतली कडी काढण्याची एक युक्ति पूर्वींच न पक्ष; आली होती. तिचा उपयोग करून ते आंत गेले. कोणास तेंकडे पाहूं लागले तों घरांत सामसूम. इतक्यांत निदान खोलींत गेले, तेथें एक छानदार नक्षीची टोपी नये. शेजारीं पडलेली त्यांना आढळली. त्यावरून आपल्ले घरांत कोणी परका मनुष्य आला असावा, असा त्यांच्या मनानें बळकट संशय घेऊन ते गंगूचा शोध इकडे तिकडे करूं लागले. मागीलदारीं जाऊन पाहतात तों गंगु हातपाय धूत बसलेली त्यांनीं पाहिली.

गणपतराव एकाएकीं घरीं आलेले पाहून तिला एका प्रकारें विस्मय व आनंद वाटून ती पटकन हातचें भांडें ठेवून त्यांजकडे धांवली. परंतु नित्याप्रमाणें गणपतरावांनीं तिला प्रेमपूर्वक कडकडून आलिंगन न देतां फक्त तिचा हात धरून " मला अगोदर याचा खुलासा काय

तो सांग; मग बाकीच्या गोष्टी " असे ह्मणत खोलीकडे तिला घेऊन टोपी दाखविली व " ही कोणाच्या डोक्यावरून येथें आली ? " असे मोघम विचारलें.

गंगूनें धूर्तपणानें गणपतरावांचा संशय तेव्हांच ताडला व लागलीच एका बाजूस एक बंद केलेलें फडताळ होतें तें उघडून दाखवून " हें पहा, ह्यांतली ती टोपी आहे. तिला कांहीं दुरुस्त करीत मी येथे बसलें होतें ह्मणून ती बाहेर राहिली आहे. हें सर्व माझ्या रिकाम्या सांपडत असलेल्या वेळेचें कृत्य होय. आणि यास मदत ... टली ह्मणजे आपण खाऊ ठसीं मधून मधून जे मला घ्यावयास सांगत होतां, ते सांचवून ठेवलेले आपल्या चाकरीचें संधान लौकर जुळेना, तेव्हां ... च्या निर्वाहाची बेगमी कमी पडू नये ह्मणून अल... क्षणाहि वायां न दवडितां आपल्याला थोडेंसे साह्य ... उद्देशानें जरा जास्त लक्ष्य देऊन ह्या वस्तु तयार आहेत. घरांतलें सामान संपल्यावर मग आपल्यास हे सर्व दाखविणार होतें. आतां याची योग्य वाटेल ती व्यवस्था करणें आपल्याकडे आहे."

गणपतरावांनीं फडताळांत पाहिलें तों रेशमाच्या, लोंकरीच्या व पोतीच्या टोप्यांचा एक बराच मोठा गंज त्यांना आढळला. त्यांची वर सांगितल्याप्रमाणे सर्व हकीकत गंगूच्या मुखानें कळल्यावर ते इतके ओशाळले कीं, त्यांना आपला निरर्थक संशय तिला कळविण्याची लाज ... वाटली. परंतु अशा सद्गुणी स्त्रीची क्षमा मागितल्या ...च्या सरळ मनास राहवेना, ह्मणून एकदम त्यां-

नीं तिच्या गळ्यास मिठी मारली व विनाकारण आपल्या हातून घडलेला अपराध तिला निवेदन केला. तो दिवस त्या दंपत्याला किती तरी आनंदाचा झाला ह्मणून सांगावें ! अस्तु.

ही गोष्ट जरी अगदीं साधी आहे तरी तिजपासून आपणास पाहिजे तें तात्पर्य सहज निघूं शकतें. तें हें कीं, कांहीं कारणांनीं स्त्रियांचें परावलंबन जरी इष्ट असल्यासारखें वाटलें, तरी स्वावलंबी स्थिति प्रसंग पडल्यास उपभोगतां येण्याची त्यांची योग्यता व तयारी करून ठेवलेली असणें, हें आपणामागें त्यांना तर काय, पण आपल्या ह्यातींत वेळेस आपणालाहि मोठें उपयोगी पडतें.

स्वातंत्र्य हें सहसा कोणी कोणाचें घेऊं नये हा उत्तम पक्ष; आणि जर कदाचित कांहीं विशेष अडचणीनें कोणास तें गमवावें किंवा कोणाचें तें घ्यावे लागलें, तर निदान त्याला त्याच्या स्वावलंबनशक्तीला तरी मुकवूं नये. ही शक्ति नसल्यास तिचा त्याला पुरवठा करावा, पण उणीव पडूं देऊं नये. अदूरदृष्टीनें घमेंडीनें, किंवा कदाचित कांहीं मतलबानेंहि स्त्रियांना आपल्यावर सर्वस्वीं अवलंबूनच ठेवण्याची पुरुषवर्गांत अगदीं भास पडून गेली आहे. पण ही भास इष्ट तर नव्हेच, पण प्रसंगवशात अनिष्टकारक होत असते.

स्त्रियांना स्वातंत्र्य असावें कीं नसावें याविषयीं आजपर्यंत पुष्कळ चर्चा झाली आहे; परंतु एथवर आह्मीं केलेल्या प्रतिपादनावरून त्यांना स्वावलंबनशक्ति असावी कीं नसावी याविषयीं मतभेद पडेल असें आह्मांस वाटत नाहीं.

विचार इतकाच कीं या शक्तीचा पुरवठा कोणत्या तऱ्हेनें व्हावा. हें पाहिलें पाहिजे.

विद्या हें स्वावलंबनाचें अगदीं अवश्य साधन आहे, याकरितां तें साधन स्त्रियांस सुलभ करून देणें हा स्वावलंबनशक्तीच्या पुरवठ्याचा पहिला उपाय होय. दुसरा उपाय विद्येचा उपयोग करतां येण्याजोगें तरी स्वातंत्र्य त्यांस असणें हा होय. स्त्रियांना स्वावलंबन तर असावें, पण आपल्या हयातींतच त्यांना तें असणें चांगलें नाहीं—निदान आवश्यकता नाहीं—असें ज्यांना वाटत असतें ते आपल्या पश्चात् कांहीं तरी द्रव्यद्वारा स्त्रियांना त्या शक्तीचा पुरवठा करून ठेवितात, याचीही गणना या बाबतींत तिसऱ्या उपायामध्यें करण्यास कांहीं हरकत नाहीं. एखाद्या पेढीवर स्त्रीच्या नांवानें कांहीं माया जमविणें किंवा कित्येक जातींत चाल आहे त्याप्रमाणें विवाहप्रसंगींच स्त्रीच्या नांवें कांहीं रक्कम निराळी करून ठेवणें हाही उपाय चांगलाच आहे; मात्र केवळ ऐपतदार लोकांनाच साध्य असा हा उपाय आहे. तैंच ठाकूरकीनें किंवा ह्या पगाराची त्या पगारांस गांठ न पडतां ज्यांच्या कुटुंबाचा निर्वाह चालला आहे, त्यांना हा शेवटीं सांगितलेला तिसरा उपाय नुसता ऐकून ठेवण्यापलीकडे कांहीं उपयोगाचा नाहीं.

पहिले दोन उपाय सांगितले ते मात्र सर्वांना साध्य आणि स्वावलंबनशक्तीचा हटकून पुरवठा करणारे आहेत. शिवाय वरील तिसऱ्या उपायाचा सदुपयोग होण्यासाठीं देखील याच उपायांची विशेष जरूरी आहे. याकरितां

या दोन उपायांची स्त्रीजनांच्या संबंधानें योजना, आह्मी सांगितल्याप्रमाणें तरी होण्यांत कोणी नाखुषी, अनुदारता किंवा उपेक्षा दाखविणार नाहींत, असें वाटतें.

आतां स्त्रीधन ह्मणून कांहीं एक प्रकार आमच्या शास्त्रग्रंथांत सांगितलेला आहे. परंतु त्याचा उपयोग फक्त कायदेव्यवहारांत मात्र होत असलेला आढळतो. त्याशिवाय अन्यत्र लोकांना त्याची ओळखसुद्धां नाहीं, मग उपयोग करून घेण्याची गोष्ट कशाला? आह्माला वाटतें कीं, हा प्रकार लोकांनीं आपल्या विचारांत घेतल्यास प्रस्तुत विषयासंबंधीं उपाययोजना करण्यांत त्यास आणखी एक साधन होणार आहे.

स्त्रीधन ह्मणजे केवळ स्त्रियांच्या स्वामित्वाचें वस्त्रपात्र, द्रव्य वगैरे पदार्थ होत. हे पदार्थ स्वतांच्या कमाईनें अर्थातच त्यांनीं मिळविलेले नसतात, परंतु कित्येक मंगलप्रसंगानें, प्रेमानें किंवा वत्सलतेनें त्यांच्या पितापुत्रपतिबंधु आदिकरून आप्तसुहृदांकडून त्यांस बक्षीस ह्मणून मिळालेले असतात. अशा निरनिराळ्या बक्षिसांस निरनिराळीं नांवें आहेत. उदाहरणार्थः—अध्यग्निक स्त्रीधन, ह्मणजे विवाहप्रसंगीं अग्नीच्या सन्निध स्त्रीस दिलेलें द्रव्य; अध्यवहानिक स्त्रीधन ह्मणजे विवाहानंतर गृहप्रवेशकाळीं दिलेलें, अधिवेदोक्त स्त्रीधन, ह्मणजे जरूरीच्या कांहीं विशेष कारणांनीं पहिल्या स्त्रीचे हयातींतच दुसरें लग्न करणें झाल्यास त्याप्रसंगीं पहिल्या स्त्रीस दिलेलें. प्रीतिदत्त स्त्रीधन ह्मणजे नवऱ्यानें खुष होऊन केवळ प्रेमानें वेळोवेळीं दिलेलें बक्षीस; अन्वाधेय स्त्रीधन, ह्मणजे विवाहानंतर सासरच्या माणसांकडून मिळालेलें

बक्षीस; शुल्कस्त्रीधन, ह्मणजे स्त्रीस विवाहकालीं जें अंदण ( अनुदान ) देतात तें. याप्रमाणें पितृदत्त, बंधुदत्त वगैरे आणखीही स्त्रीधनाचे प्रकार आहेत.

हे आपले पूर्वापर प्रकार जे आपण हल्लीं मुद्दाम विसरल्यासारखें करतों किंवा त्यांचा निदान करून घ्यावा तसा फायदा करून घेण्यांत पूर्ण दुर्लक्ष्य करतों तें जर केलें नाहीं तर स्त्रियांना स्वावलंबनशक्तीचा पुरवठा करण्याचे वरतीं जे कांहीं उपाय दिग्दर्शनरूपानें दाखविले त्यांतच याहि प्रकाराची गणना करण्यास कांहीं हरकत नसावी, असें आह्मांस वाटतें. या धनावर स्त्रियांचेंच स्वामित्व पूर्ण राहील व कारणप्रसंगीं त्याचा उपभोग घेण्याचें केवळ त्यांच्याच खुषीवर राहील तर फार उत्तम आहे. याकरितां या गोष्टीचा स्वतः स्त्रियांनीं त्याचप्रमाणें त्यांचें कल्याण इच्छिणाऱ्या पुरुषांनीं अवश्य विचार करावा इतकेंच शेवटीं सुचवून तूर्त वाचक मंडळीची रजा घेऊं

प्रकरण आठवें समाप्त.



# विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें.

( किमतीशिवाय टपाल खर्च निराळा पडे )

## सुशील स्त्रीया आणि पुरुष यांच्याकरितां

| | | आणे. |
|---|---|---|
| १ | स्त्रीशिक्षणज्ञानमाला. .... .... .... .... | १२ |
| २ | संसारदर्पण. .... .... .... .... .... | १० |
| ३ | सासुरवास चंद्रिका. ( पूर्व भाग. ) .... .... | ७ |
| ४ | सासुरवास चंद्रिका. ( उत्तर भाग. ) .... ... | ५ |
| ५ | मुलींची सासरी वागणूक. .... .... .... .... | ६ |
| ६ | स्त्रियांचे नेत्रकटाक्ष .... .... .... .... .... | ३ |
| ७ | गुलबंकावली. .... .... .... .... .... | १-४ |

---

## विश्रांतीच्या वेळीं करमणूक होणारीं पुस्तकें.

| | | आणे. |
|---|---|---|
| १ | कुंटिणकृत्यांचे चमत्कार. ... ... .... .... | ८ |
| २ | तरुण स्त्रियांची मौज. ... .... ... .... | ५ |
| ३ | स्त्रियांचीं मंगळ कार्ये. ... ... ... ... | ५ |
| ४ | स्वतंत्र विधवा व त्यांच्या तरुण मुली. ... .... | ५ |
| ५ | तरुण बायको अथवा स्त्रियांची स्वतंत्रता. .. .... | ५ |
| | न्हाणवली आणि ऋतुशांति. (आ. ३) ... ... | ५ |
| | अनाचाराचा परिणाम. .... ... ... ... | ५ |
| | गारुडी लोकांच्या खेळाचें पुस्तक. .... ... ... | ६ |
| | संगीत गोपीचंदनाटक ( अंक ७. ) ... ... | ९ |